वीरांगना

राणी

# संयोगिता.



 किंमत १२ आणे.

अमरावती येथील

एफ्. आर. सी. वाय्. कंपनी तर्फें प्रसिद्ध होणाऱ्या

पुस्तकांपैकीं पहिलें पुस्तक.

# वीरांगना

# राणी संयोगिता.

हें पुस्तक

रामचंद्र यशवंत केसकर

यांनीं रचिलें

तें अमरावती येथें

'प्रमोदसिंधु छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.'

आवृत्ति पहिली.

१९०१.

किंमत १२ आणे.

# प्रस्तावना.

कथानक ऐतिहासिक तर खरेंच; पण नाटक या रूपानें तें पुढें आणण्यास अवश्य वाटणारे कांहीं फेरफार केले आहेत. पृथ्विराजाच्या मरणाबद्दल तीन प्रकारचीं मतें आहेत; पण ग्रंथकर्त्याला नाटकाकरितां तिसऱ्या मताचाच स्वीकार करणें बरें वाटलें. यापेक्षां जास्त प्रस्तावना लांबविणें नको. शेवटीं हें पुस्तक लिहिल्यापासून प्रसिद्ध होईपर्यंत मेसर्स गणेश श्रीकृष्ण खापर्डे, महमद अबदूल कादर बी. ए. एल् एल्. बी., सदाशिवराव पिंपळखरे ( पुण्याचे प्रसिद्ध चित्रकार ), द. भा. जयवंत, के. डी. चव्हाण, डा० सरफराज अल्ली व इतर कांहीं सद्गृहस्थांनीं पुस्तक सुधारण्याचें कामीं आपला अमोलिक वेळ खर्च करून अनेक तऱ्हांनीं मदत केली सबब मी त्यांचे मनापासून आभार मानितों; तसेंच यांतलि खरे दोष कोणी दाखविल्यास मी त्यांचा आभारी होऊन द्वितीय आवृत्तींत अवश्य सुधारणा करीन.

अमरावती,
१०–७–१९०१.

रा. य. के.

# अभिप्राय.



... ... ... ... ...रसनिष्पत्ति बरीच झाली आहे. संविधानक ऐतिहासिक असून फार मनोरम आहे; विषेशतः राणी संयोगितेचें चातुर्य व साहकारी फितले असतांहि पृथ्विराजाची कार्यक्षमता ही वर्णनीय आहेत.

गणेश श्रीकृष्ण खापर्डे.

---

I read most of the Marathi drama "Virângana Râni Sanyogitâ". The plot is simple and very interesting. The language is mostly chaste and suited to the sentiments described. The characters of संयोगिता, पृथ्विराज, and other chief persons, are well delineated. Altogether I was pleased with the perusal of the book which deserves public support.

R. B. Talvalkar,
Head Master High-School,
Amraoti.

Amraoti,
21-7-1901

## ( वरील अभिप्रायाचा मराठी सारांश. )

" वीरांगना राणी संयोगिता " नाटक मीं बहुतेक सर्व वाचलें. कथानक साधें असून फार चित्ताल्हादक आहे. नाटकांतील ज्या ज्या स्थलीं जे जे रस आलेले आहेत त्या त्या स्थलीं त्या त्या रसांला अनुरूप अशीच भाषा साधली आहे. पृथ्विराज, संयोगिता व इतर मुख्य भूमिका फारच मार्मिकतेनें वठविल्या आहेत. थोडक्यांत पुस्तक उत्तम झालें आहे हें पाहून मला आनंद वाटतो; व हें लोकाश्रयास पात्र आहे.

अमरावती, २–७–१९०१ } रघुनाथ बाळकृष्ण तळवळकर, हेडमास्तर हायस्कूल अमरावती.

# पात्रें.

जयचंद—कनोजचा राठोड राजा.

कह्रकंठीर—जयचंदाचा सेनापति.

| | | |
|---|---|---|
| रामसिंव्ह— | } | जयचंदाचे लष्करी कामगार. |
| जवानसिंग— | | |

पृथ्विराज चव्हाण—दिल्लीचा राजा.

समरसिंव्ह—चितोडचा राजा; पृथ्विराजाचा मित्र.

आततताई—पृथ्विराजाचा सेनापति.

| | | |
|---|---|---|
| रामगुरू— | } | पृथ्विराजाचे सरदार. |
| लंगरीराय— | | |

श्रीकंठ—जयचंदाचा पुरोहित.

शहाबुद्दीन घोरी—हिंदुस्थानावर चालून येणारा एक पठाण राजा.

वजीर—त्याचा प्रधान.

जाफरखां—घोरीचा सरदार.

संयोगिता—जयचंदाची कन्या.

मालती—तिची दासी.

शिपाई, जासूद, उपाध्या, सख्या, वगैरे इतर.

## स्थळें.

कनोज—दिल्ली—आणि तिलावडीचें मैदान.

वीरांगना

# राणी संयोगिता.

( एक वीररसप्रधान ऐतिहासिक नाटक. )

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

[ कनोज शहरांतील एक रस्ता.
रामसिंह व जवानसिंग प्र. क. ]

रा०—राजा जयचंदासारख्या वीरश्रेष्ठाला असा अपमान कसा सहन होईल ! पृथ्विराज कितीही बलाढ्य झाला तरी त्याची मांडलीकांतच गणना होते ना ?

ज०–पण त्याजकडून असा प्रमाद तरी काय घडला ?

रा०–प्रमाद काय घडला ? अहो आजच्या आज ही बातमी या कनोज शहरांतील सर्व आबालवृद्धांना देखील समजली असून, तुह्माला त्याची कांहींच खबर नाहीं !

ज०–पण मला ती कशी माहीत व्हावी ? संयोगिताबाईसाहेबांच्या स्वयंवराकरितां जवळच्या राजे लोकांनां आमंत्रण पत्रिका देऊन मी हा आतांच शहरांत पाय ठेविला.

रा०–असें असेल तर मी सांगतों तुह्माला ती सर्व हकीकत. तुह्मांप्रमाणेंच स्वयंवराची आमंत्रण पत्रिका घेऊन खुद्द खासगी कारभारी दिल्लीला गेले. पृथ्विराजानें त्यांचें योग्य प्रकारें स्वागत केलें व त्यांच्या सन्मानार्थ दरबार भरवून त्यांत आमच्या महाराजांचा अपमान केला.

ज०–तो कसा ?

शा०—पत्रिका वाचल्यानंतर पृथ्विराज किंचित् हंसला, आणि ह्मणाला ज्या राजानं आपल्या शेतकन्यांना वरानें मागणी केली असतां ती नाकारून आपल्या कन्या कुबड्या झाल्या असतां पश्चाताप पावून त्याच वराला त्यांनां अर्पण केल्या, त्याच राजाच्या वंशजांनीं कन्येचें स्वयंवर करण्याचें कारण काय ? जामाताकडून पराभव करून घेऊन त्यानं कन्येचं हरण करावं हेंच कान्यकुब्जपतिला शोभतं.

ज०—पण कायहो राठोड आणि चव्हाण यांचें जर पूर्वींपासूनच हाडवैर होतं, तर आपल्या महाराजांनीं तरी पृथ्विराजाकडे पत्रिका कां पाठविली ?

शा०—अहो त्यांत तरी पृथ्विराजाचा अपमान करण्याचाच उद्देश होता. कारण पृथ्विराज आणि आपले महाराज यांच्या वैमनस्याची सर्व कथा संयोगिताबाईसाहेबांस ठाऊक असल्यामुळें पृथ्विराज स्वयंवराला आला असता तरी देखील त्याला संयोगिताबाईसाहेबांनीं माळ घातली नसती आणि मग साहजिकच—

ज०—हं आतां समजलों तें. मग पुढं काय झालं ?

रा०—पुढें पृथ्विराजानं पत्रिकेचं उत्तर ह्मणून कारभारी साहेबांबरोबर एक बुरखा पाठविला आणि सांगितलं कीं याचा नीट उपयोग करा.

ज०—रामसिंह, मला वाटतं कीं यांत कांहीं पृथ्विराजाचा अपराध नाहीं. कारण तुह्मी त्याचा अपमान करण्याच्या उद्देशानं पाठविलेल्या पत्रिकेचं इंगित ते समजले.

रा०—तरी पण मांडलिकांना असं करणं योग्य होत कां ?

ज०—अहो तुह्मी त्यांना मांडलीक समजतां ह्मणून कां ते मांडलीक होतील? त्यांचो कांहीं तुह्माला खंडणी येत नाहीं. शिवाय नुक्ताच झालेल्या राजसूयज्ञाचे प्रसंगीं त्यांनीं तुमचं स्वामित्व उघडपणें झुगारून दिलं आहे.

रा०—असं असलं तरी आमच्या महाराजांनीं हा अपमान कां सहन करावा ?

ज०—हं—ही गोष्ट निराळी. अपमान सहन करूं नये, असं मी सुद्धां ह्मणेन. पण आमच्या महाराजांनीं आपण होऊन कलहाचा प्रसंग आणावयाचा नव्हता.

रा०—आणावयाचा नव्हता हें खरं; पण आणलाच आहे, तेव्हां आपणालाहि आतां त्यांची बाजू राखणं जरूर आहे.

ज०—हेंच तर काय पण सरकारचा हुकूम होतांच आह्मी त्या निरपराधी पृथ्विराजाच्या सेनेवर तुटून पडण्यासहि कमी करणार नाहीं.

रा०—शाबास खाल्लेल्या अन्नाचं असंच चीज केलं पाहिजे.

ज०—तरी पण न्यायान्याय व सत्यासत्य तर पाहिलं पाहिजेना ?

रा०—अहो आपला न्याय व सत्य सर्व स्वामीसेवा हें होय. तुह्मीच पहा, कीं फक्त आपल्याच विश्वासावर महाराज वाटेल त्या देशावर बेधडक स्वाऱ्या करितात, वाटेल त्या बलवत्त्याशीं झुंजण्यास कंबर खेंचतात,

आपल्या राज्यापासून अतिशय दूर आणि अगदीं अनोळखी अशा प्रदेशावर आपलें निशाण फडकविण्याची इच्छा धरितात आणि आपल्यावरच विश्वास ठेऊन ते आपल्या सर्व सैन्याविषयीं अगदीं बेफिकीर असतात—मग आपणच जर बेइमानी केली तर———

ज०—छे, छे; परमेश्वरा असा अधमपणा करण्याची बुद्धि या जवानसिंगाला कधींहि देऊं नकोस.

रा०—आणि या रामसिंहालाहि त्यापासून अगदीं दूर ठेव.

ज०—पण हें पहा बोलतां बोलतां आपण थेट संयोगिताबाईसाहेबांच्या बागेजवळ येऊन ठेपलों.

रा०—खरंच——तें पहा त्या हजारधारी कारंज्या समोरील पुष्पवाटिकेंतून राठोडकुलनंदिनी कुमारी संयोगिता जणूं काय दुसरी वनदेवताच आपल्या सखीसह कांहीं हितगुज सांगत हिंडत आहे तरी त्यांच्या सुखांत विघ्न न आणतां आपण दुसऱ्या रस्त्यानें वाड्यांत जाऊं चला.

पहिला प्रवेश समाप्त.

## प्रवेश दुसरा.

### ( संयोगितेचा बगिचा. )

[ संयोगिता व मालती बोलत येतात ]

सं०—मग पुढं काय ह्मणाले ?

मा०—मग त्यांनीं आपल्या देशाला कान्यकुब्ज हें नांव कसं पडलं याचा इतिहास सांगून, महाराजांनीं कन्येचं स्वयंवर करणं योग्य नाहीं, असं सांगून कारभाऱ्यांना परत पाठविलं. ( संयोगिता हंसते ) पण बाईसाहेब हें काय ? महाराजांचा केलेला अपमान ऐकून आपणाला राग यावयाचा तो न येतां आपण हंसतां हें कसं ?

सं०—अहाग खुळे. याला कां कुठं अपमान ह्मणतात? खरं होतं तेंच त्यांनीं सांगितलं पण त्या कारभाऱ्याला त्याचा अर्थ समजला नाहीं त्याला कोण काय करील.

मा०—ह्मणजे ? याचा तो अर्थ काय समजायचा?

सं०—अग आपल्या महाराजांनीं माझं स्वयंवर करूं नये असं ते ह्मणालेना ?

मा०—मग ?

सं०—आणि याला वरूणानीं बाबांच्या पूर्वजांच्या शतकन्या कुबड्या केल्याचं उदाहरण दिलंना ?

मा०—होय, पण अशा रीतीनं जयचंद महाराजांना खजिल करणं त्यांना योग्य होतं कां ?

सं०—अग यांत तें त्यांनी काय खजिल केलं. त्यांनीं इतकंच सुचविलं कीं संयोगितेनं पसंत केलेल्या वराशीं तिचा विवाह न लावतां तिचं स्वयंवर करणं धोक्याचं होईल, आणि केलं असलं तरी श्वशुरापेक्षां जामात जास्त पराक्रमी असणं हेंच चांगलं. माझं स्वयंवर झालं तरी मी दिल्लीपती खेरीज कुणालाहि माळ घालणार नाहीं; ह्मणून स्वयंवर करणं धोक्याचं होईल असं त्यांनीं सुचविलं.

मा०—( हसून ) अस्सं अस्सं, आमच्या बाईसाहेबांनी याचा असा अर्थ काढला तर.

सं०—काढायचा काय, उघडच नाही कां ?

मा०—पण बाईसाहेब पसंत केलेल्या वराला स्वयंवरांत माळ घालतां नसती कां आली ? मग स्वयंवर करणं योग्य नव्हें, याचा अर्थ काय ?

सं०—पसंत केलेला वर स्वयंवराला येत नाहीं असं यावरून सुचवलं, दुसरं काय!

मा०—मग बाईसाहेब याला आपण आतां कोणती युक्ति काढणार ?

सं०—त्याच विचारांत मी आहें, पण इतके दिवस तूं मजजवळ असून तुला कांहींच कां युक्ति सुचत नाहीं?

मा०—नाहीं कशी ? मला एक छान युक्ति सुचली आहे.

सं०—सांग पाहूं कोणती ती !

मा०—हे पहा, माता रुक्मिणीनं ज्याप्रमाणें श्री-कृष्णाला याचकाबरोबर पत्र पाठविलं, त्याचप्रमाणं आपणही पृथ्विराज महाराजांकड एक पाठवा आणि त्यांत लिहा कीं आपण स्वयंवराला आल्यास आपला अपमान न होतां, येण्याचं चीज होईल.

सं०—हो, असं केलं असतां काम होईल गडे. पण दिल्लोला पत्र न्यावं कोणी हीच अडचण आहे. आणि समज कीं कोणी तयार झालं—पण ही गोष्ट बाबांनां समजल्यास पत्र पाठविणाराची आणि घेऊन जाणाराची काय दशा होईल याची तुला कल्पना तरी होते कां?

मा०—हें मात्र खरं, मग किनी, नलराजानी ज्याप्र-माणं राजहंस दमयंतीकडे पाठविला तसा तरी एखादा पक्षी निवडून काढा.

सं०—तेवढं कुठं या संयोगितेचं भाग्य आहे. (सुस्कारा सोडून) देवा मग काय मला माझ्या मताविरूद्ध दुसऱ्याच्याच गळ्यांत ही जयमाला घालावी लागणार कां! (उठून) काय? शूर राठोड कुलांत जन्म घेतलेल्या रजपूत कन्येचेच हे उद्गार ? आगलागो असे शब्द उच्चारणाऱ्या जिव्हेला—रजपूत कन्येनं एकवेळ ज्याला मनानं वरलं आहे त्या खेरीज दुसऱ्याकडे ती प्राणांतींही ढुंकून पाहणार नाहीं. श्रीसोमनाथाची शपथ घेऊन मी हीच प्रतिज्ञा करितें कीं बाबांनीं माझें

कितीही हाल केले, माझा कितीही छळ केला, मज-वर कितीही भयंकर संकटें आलीं तरी मी त्या वीरमणी पृथ्विराजाच्याच गळ्यांत माळ घालीन, नाहीं तर जन्मभर अविवाहीतच राहीन. ( सचिंत बसून ) पण आतां—

सा०—बाईसाहेब प्रतिज्ञा तर झाली, आतां ती पूर्ण करण्याच्या उद्योगाला तर लागलें पाहिजेना? आणखी कांहीं घटकेनी आपणाला स्वयंवराकरितां जावें लागणार; मग हें व्हावं कसं ?

स०—मी सुद्धां त्याच चिंतेंत आहें. कांहीं सुचत नाहीं.

मा०—पण बाईसाहेब आपल्या कडूनच दिल्लीश्वरा-ला कळविण्याची खटपट कां करा ?

स०—अग त्याखेरीज त्यांनां ते कसं समजावं ?

मा०—पण मी ह्मणतें कीं आपण जसं पूर्वींपासून त्यांच्यावर प्रेम करीत आहां तसं त्यांनीं तुमच्या आधी कां करूं नये-बाईसाहेब मी अगदीं खरं

सांगतें; आपल्याला राग नका कांहीं येऊं देऊ–पुरुषांची जातच अशी आहे, त्यांना वाटतं कीं त्यांच्या वांचून आमचा जन्म व्यर्थ जातो पण आमच्यावांचून त्यांचं कांहींच अडत नाहीं हो.

स०–अग तूं असं कशावरून ह्मणतेस ?

मा०–कशावरून ह्मणजे? श्रीकृष्णाला माळ घालण्याचा रुक्मिणीचा निश्चय होता, पण तिनें आपण होऊन त्याला पत्रिका पाठविल्या शिवाय तो आला कां? तसंच भयानक अरण्यें ओलांडून, मोठ मोठाले पहाड फोडून, पाताळासारख्या खोल दऱ्यांतून बिचारी गंगा सागराला भेटण्यासाठीं धांवत गेली, तरी देखील तो मानी आपली सीमा ओलांडून तिला सामोरा देखील आला नाहीं. काय तरी हा त्यांचा मानीपणा !

सं०–अग, एक दोघांकरितां सर्व पुरुषजातीला दुषण देणं बरं नव्हे. तूं ह्मणतीस त्याच्या उलट उदाहरणं थोडीं कां आहेत ? पुण्यश्लोकराजा नळ दमयंतीचा वृत्तांत ऐकतांच अगदीं वेडा होऊन, प्रथमतः

राजहंसा कडून त्यांनीच निरोप पाठविलाना ? पंडू पुत्र धनंजय ह्यानें सुभद्रेकरितां सन्यास देखील घेतला. मग आतां सांग बरं पुरुष जातीला कां दोष द्यावा. ही तर लांबचीं उदाहरणें दिलीं पण आपल्या पुर्वजांच्या शतकन्यांवर लुब्ध होऊन वरुणानीं आपण होऊनच मागणी केली नव्हती कां ?

( एक दासी येते. )

दा०–बाईसाहेब तिकडे तयारी झाली आहे. तेव्हां आतां इथंच किती वेळ बसायचं. ( मालती त्या दासी जवळ कांहीं कुजबुजते. )

सं०–( मनांत ) आतां करावं तरी काय बाई! ‘ हे दिल्लीश्वरा या वेळेला आपण आपला वैरभाव विसरून स्वयंवराला आला असतात, तर किती तरी चांगलं झालं असतं. तुमच्या उभयतांच्या या वैराग्नींत एका अनाथ कुमारिकेची आहुती पडत आहे याची तुम्हाला कल्पना देखील नाहींना ! पण ती तुम्हाला कशी असावी ! तुमच्या कट्ट्या शत्रूची एकुलती एक कन्या तुम्हाला आपला देह अर्पण करण्यास तयार

झाली आहे हें तुह्माला खरं देखील वाटणार नाहीं.
( मालती दासीला खुण करत्ये. ती जाते. )

सं०—कायग, काय कुजबुजत होतीस तिच्याशीं ?

मा०—काय सांगु बाईसाहेब. तीनं एक फार वाईट गोष्ट सांगितली.

सं०—ती कोणती. ?

मा०—हीच कीं जयचंद महराज पृथ्विराजानीं कलेला अपमान भरून काढण्याकरितां आज दरबारांत त्यांचा पुतळा करून चोपदाराच्या जागीं बसविणार आहेत आणि त्यांनीं पाठविलेला बुरखा त्यांच्याच पुतळ्यावर घालणार आहेत.

सं०—( स्तब्ध राहून व हंसून ) एकूण आजच्या दरबारचं भाग्य फारच थोर आहे ह्मणायचं.

मा०—ह्मणजे ? मला वाटलं कीं हें ऐकतांच तुह्माला अतिशय राग येईल ह्मणून; पण इथं पाहते तों निराळंच.

सं०—अग मनासारखी गोष्ट झाल्यावर राग यायचा कां आनंद व्हायचा ?

मा०--झालं हें मनासारखंच झालं कां ?

सं०--अगदीं मनासारखं.

मा०--मग आपला आतां काय करण्याचा निश्चय झाला सांगा पाहूं.

[ एक दासी धांवत येते ]

दा०--बाईसाहेब--आटपा आतां लौकर महाराजांनीं सांगितलय कीं दरबारची वेळ झाली तेंव्हां बाई साहेबांना चांगला शृंगार करून लौकर तयार ठेवा.

मा०--शृंगार ? पहा बाई त्यांना आवडला तर.

सं०--नाहींग--अशा शुभ प्रसंगीं मला तो कसा आवडणार नाहीं ? जा लौकर ही मी आलेंच, तों पावतंर माझा तो पिंवळा बुट्टेदार शालू, रत्नहार, झालं तर तो पांचेचा कंठा वगैरे, सगळ्या जिनसा काढून तयार ठेवअं. जा. ( दासी जाते. )

मा०--काय बाई सगळाच चमत्कार ! इतकं अगदीं नटून थटून आतां आपल्या मनाजोगं तें काय होणार ?

सं०--काय होणार ? लवकरच दिसेल हो. ( पड-

द्यांत भालदारांच्या ललकारण्या ऐकूं येतात. ) हें बघ दरबारची मंडळी निघाली सुद्धां—आटप—चल लवकर.—

मा०—चला बाई, काय करणार आहांत देव जाणें.

( प्रवेश दुसरा समाप्त. )

## प्रवेश ३ रा.

—०—

( राजा जयचंद्राचा दरबार. )

( जयचंद सिंहासनावर बसला आहे, दुतर्फा इतर राजेलोक बसले आहेत व चोपदाराचे जागीं पृथ्विराजाचा पुतळा मांडला आहेसें दिसतें. )

भाट०—( पद्यांत )

" जहां आसनं सूर ठठ्ठे सनाहं, जिनें छात्रिवंशं किए एकराहं ।
जिनें धरनि दिक्पाल धर्धर विखण्डं, धरे नृप्पछत्रं दुती कन्कदण्डं ॥
जिनें हेमपर्वत्तसे सब्बठाहे, जिनें एक दिन अठ्ठ सुल्तान साहे ।

बरं जंपियो सच्चजो चन्द चण्डं, सुते थप्पियो जाय तिर्हुत पण्डं ॥

जिने दच्छिनं देशअप्यो विचारे, तथे ऊतयों तुर्तबन्धं पहारे ।

जहां करनडा हाल दुब्बान बध्यो, जिनें संधिचालूकके चारखेंद्यो ॥

जहां गिनदिन् जुद्ध भिर भूमिडण्डं, तहांतोरी तीलंग गोवाल कुंडं ।

जिने छंडिओं बन्धी इकू गुंडजीरा, अहे छीध वैरागरे अब्बहीरा ॥

जहां गज्जने सूरसाहाबसाही, तिने मोकल्यो सेव नीपुरतभाई ।

जहां छोंडि बीभीषणे जोमरोरे, तहांरोसके सोसदर्यो हिलोरे ॥

जिने बाघ्रे खुरसान किया भीरबन्दा, सुतोराव राठोर विजेपालनंदा ।

इतेबंश छत्रीश आवे हकारे, तहां ईक चव्हान् पृथ्वूराज ठारे ॥ ”

[ जयचंद थोडासा रागावलेला दिसतो. ]

कहरकंठीर—सरकार या भाटानें आपल्या पराक्रमाचें आणि ऐश्वर्याचें वर्णन अगदीं योग्य केलें पण पृथ्विराज या दरबारला आला नाहीं हें सुचवून मात्र आह्माला संताप उत्पन्न केला. राजा जयचंदाचे दरबारीं पृथ्विराजा चोपदार सुद्धां शोभत नाहीं. त्या मदांधाला हा कहरकंठीर कंठस्नान घातल्या वांचून कधींही विश्रांति घेणार नाहीं. पृथ्विराजाचा तो काय पाड ? थोडा थोडका नव्हे, चार लाख घोडेस्वार, सोळा लाख पायदळ, सहा लाख तीरकमटवाले, साठहजार भालेवाले आणि चोवीस हजार बर्चीवाले ह्या एवढ्या मोठ्या सेनासमुद्राचा भंगकरून कोणत्या मायचा पूत पार पडेल ? रणमैदानांत असे अगणित पृथ्विराजे जरी समोर आले तरी महाराजांच्या पुण्यप्रतापानें त्यांनां एका क्षणांत पाताळांत दडपून टाकू. महाराजांच्या विजयी सैन्यानें एकवेळ त्या

दिल्लीला वेढा दिल्यावर तेथील सेनेला एकतर आंत-ल्याआंत कुजून मरावें लागेल अगर बाहेर पडून आमच्या तरवारीला बळी पडावें लागेल, याची पक्की खात्री असू द्या.

ज०—सेनापती, तुमच्या पराक्रमाबद्दल आमची खात्री आहे. पण सध्यांच या गोष्टीचा विचार नको. या मंगलकार्यानंतर त्याचा विचार करूं. कोण आहेरे, पुरोहितांना ह्मणावें कीं संयोगितेच्या हातीं जयमाला देऊन तिला दरबारांत घेऊन या. कारभारी, पुढील समारंभाची आपले कडून तयारी आहेना ?

का०—सर्व कांहीं तयार आहे सरकार. [ संयोगिता जयमाला घेऊन दोन तीन सख्यांसह व पुरोहितासह प्रवेश करिते. ]

पु०—मुली अशी इकडे ये. हा समारंभ कशाचा आहे हें तुला माहीतच आहे. तरी तुझ्या पित्यानें तुला दिलेल्या सुसंधीचा योग्य उपयोग कर. या सर्व सभेचें चांगलें निरीक्षण करून तूं आपल्या जन्माचा सुखदुःखाचा वाटेकरी शोधुन काढ. मात्र तूं आपल्या

वरील जोखीम पूर्णपणें लक्षांत घेऊन मग कायतें क[ा]
कारण हें तूं पक्के ध्यानांत ठेव कीं फक्त ह्याच क्षणीच्य[ा]
तुझ्या शहाणपणाचीं तुला जन्मभर फळें भोगावीं लाग[]
तील. तूं आपलें रूप-कुळ शील-वगैरे सर्व ध्यानां[त]
ठेऊन त्याला साजेल अशीच निवड कर. तुझ्या चातु[र्]
र्यावर आमचा भरंवसा आहेच—पण वेळींच जागें करणे
चांगलें ह्मणून सांगितल्यावांचून राहवत नाहीं—हं आटप
श्रीसोमनाथ तुला सुबुद्धी देवो.

ज०—हं संयोगिते आतां कोणत्या भाग्यवानाव[र]
अनुग्रह करत्येस पाहूं. मालती, तिच्याबरोबर तूं रा[]
हून तिला सर्व सभेची ओळख करून दे. [ संयोगिन[ी]
सखीसह पहिल्या राजाजवळ येते. ]

मा०—बाई साहेब. हे सोजतचे राजे, यांना राव
ह्मणतात—याचें राज्य चांगलें विस्तृत असून यांच्याज
वळ चांगले लढाऊ आठ लाख सैन्य आहे. हे आप
ल्या प्रजेचें योग्य प्रकारें पालन करीत असून धर्मा[]

चांगले रक्षण करीत आहेत—आपल्या महाराजांच्या मांडलिकांपैकींच हे एक होत.

( संयोगिता तशीच खालीं मान घालून उभी आहेसें पाहून पुढें चालते. )

मा०—बाईसाहेब हे आपल्या महाराजांच्या प्रचंड दळभाराचे सेनापती. यांचे नांव कहरकंठीर. यांचा जन्म प्राचीनकाळीं सार्वभौम असणारे प्रसिद्ध प्रमार-राजे यांच्या वंशांत झाला. रणांगणांत यांच्या बरोबर फक्त शंख वाजविणारेच एक हजार अस-तात. यावरून यांच्या इतर सेना समुहाची कल्पना होते. ह्या विरानीं आजपर्यंत राजा जयचंदाचा अपजय कधींही होऊं दिला नाहीं, यांच्यासारखा शूरवीर आपल्या राजांत दुसरा कोणीही नाहीं.
( संयोगिता तशीच उभी आहेसें पाहून पुढें चालते. जयचंद चिंताग्रस्त होतो. )

मा०—बाईसाहेब—हे समुद्रा पलीकडील लंकाद्वि-पाचे अधिपति—यांना राजा बिभीषण ह्मणतात.

यांना आपल्या महाराजांनीं नुक्तेंच जिंकले अ तरी त्यांचा देश त्यांच्याकडे कायम असून त्यांच्य कडून महाराजांना फक्त खंडणी येत असते. यां राज्य मोठें असून प्रजा सधन आणि सुखी आहे तसेंच हे स्वतः देखील चांगले पराक्रमी आहेत यांचे ऐश्वर्यही चांगले असून यांच्या राज्यां धर्मांचे चांगल्या प्रकारें पालन होत आहे.

( संयोगिता तशीच उभी आहेसें पाहून पु चालते )

मा०—बाईसाहेब हे अन्हीलपुरचे राजे. यां नांव भीमदेव. यांचा जन्म चालुक्य वंशांत झाल यांचा पराक्रम यांच्या नांवाला शोभण्यासारखा आहे. रणांत यशस्वी ह्मणून यांची प्रसिद्धि आहे यांचे ताब्यात अनेक किल्ले असून पुष्कळ मांडलीक यांना करभार देतात, यांच्या राज्यांत धर्मांचे चांगलें पालन होत आहे.

( संयोगिता तशीच उभी आहेसें पाहून पुढें चालते. )

मा०—बाईसाहेब हे परमाल राजाचे दरबारांतील एक वीरपुरुष होत-यांना अल्ह ह्मणतात. सध्यां हे आपल्या महाराजांचे पदरीं एक सरदार आहेत. हे गोरखनाथाचे शिष्य आहेत—यांचे पदरीं जरी फारशी सेना नाही तरी हे स्वतः फारच शूर आहेत. यांच्या इभ्रतीला योग्य असा याच्याजवळ सरंजाम आहे. हे मोठ्या नांवलौकीकाचे आहेत.

( संयोगिता तशीच उभी आहेसें पाहून त्या रांगेचे शेवटीं पृथ्विराजाचे पुतळ्याजवळ येतात. )

मा०—बाईसाहेब हा पृथ्विराजाचा पुतळा—हे दिल्लीपती आहेत. यांचा जन्म प्रसिद्ध चव्हाण कुलांत झाला आहे. हे शद्बभेदी असून कर्ण, अश्वत्थामा, धनंजय, रामचंद्र यां सारखे शूर आहेत. स्वदेशा करितां आणि धर्माकरितां यांनीं आपलं सर्वस्व अर्पण केलं आहे. आपले महाराज आपणाला सार्वभौम

ह्मणवितात पण या शूर पुरुषानं त्यांचं स्वामित्व अग
झुगारून दिलं आहे. यांच्यावर रणदेवतेची
राज्यलक्ष्मीची पूर्ण कृपा आहे. आपल्या स्वयंवरा
करितां यांच्याकडे अमंत्रण पत्रिका घेऊन गेलेल्य
आपल्या कारभाऱ्याचा अपमान केला ह्मणून आपल्य
महाराजांनीं त्यांचा पुतळा करून येथें बसविला आहे
व त्यांनीं पाठविलेला हा बुरखा त्यांच्याच पुतळ्याव
घातला आहे. आज हयात असलेल्या सर्व क्षत्रि
राजांमध्यें यांच्या तोडीचे शूर, रणधीर वीरमण
कचितच सांपडतील. यांचा सेनापती श्रीशंकराच्य
गणापैकीं एक होय. यांच्या दरबारांतील चतु
चंदकवी देवीकालिकेचे भक्त आहेत. यांचं ऐश्व
ह्मणजे हे मृत्युलोकीचे कुबेरच आहेत. यांचं नां
ऐकतांच शत्रूपक्षीं पांचावर धारण बसते. पण
याच्यांशीं तुह्माला काय करावयाचं ? इतके असले
तरीं हे आपल्या महाराजांचे शत्रू आहेत तेव्हां
आपणाला माळ—

( संयोगिता पुतळ्याला माळ घालून त्या वरील बुरखा आपल्या तोंडावर घेते. सर्व चकित होतात. जयचंद एकदम तरवार उपसून तिला मारण्यास धांवतो. सर्वजण त्याचा हात धरितात. )

ज०—कुलांगारे, राठोड कुलाला नर्कांत लोटण्यास कशी प्रवृत्त झालीस !

क०—सरकार स्त्री जातीवर क्षत्रीयांनीं हत्यार चालविणें अगदीं अयोग्य.

रावण०—त्यांतून ज्याअर्थी महाराजांनीं स्वयंवर केलें आहे त्याअर्थी त्यांना तिला अटकाव करण्याची सत्ता राहिली नाहीं.

ज०—काय ! माझ्या कट्या शत्रूला प्रत्यक्ष कन्येनं माळ घालून माझ्या धवलयशध्वजास काळाकुळकुळीत डाग लावला—कनोजनिवासी सर्व प्रजेस लज्जेनें खालीं पहावयास लावलें, आणि माझा असा उपमर्द केला त्याबद्दल तिला शासन करण्याची

मला सत्ता नाहीं ह्मणता याचा अर्थ काय ? पुरोहित बोला लवकर.

पु०—सरकार धर्मशास्त्राप्रमाणें पहातां स्वयंवरांत कन्या ज्याला माळ घालील तोच तिचा पति झाला. त्याच्याशींच तिचा विवाह लागला पाहिजे.

क०—कसलं हें धर्मशास्त्र ? ह्या ठिकाणीं मुलीनें ज्याला माळ घातली तो स्वतः येथें हजर नसतां त्याच्या पुतळ्याला इनें माळ घातली आहे तेव्हां अर्थात हें कृत्य धर्माच्या विरूद्ध असलें पाहिजे. शिवाय ज्या सार्वभौम प्रभूनें एका दिवसांत आठ सुलतानांना काबीज केलें, ज्यांना सर्व राजे सुवर्ण करभार देत आहेत, ज्यानें विंध्याचलाच्या खालचा दक्षिण देश पादाक्रांत केला, आपल्या भुजबळानें तिर्हुता पर्यंत आपला ताबा बसविला, मीर खुरासानासारख्या महावीरांला कैद करून दांतीं तृण धरण्यास भाग पाडले, त्या नरवीर राजा जयचंदाला आपल्या अल्लड पोरीचा बेत पलटविण्याची सत्ता नाहीं असें कोण ह्मणेल ?

श०—राजा जयचंद आहे यापेक्षां शतपट पराक्रमी असला तरी देखील धर्म कृत्यांत फेरफार करण्याचें त्यांना सामर्थ्य नाहीं व ते तसे करणारही नाहींत. स्वयंवर प्रसंगीं पुतळ्याला जरी तिनें माळ घातली आहे तरी तो पुतळा कोणाचा आहे हें तिला पक्के माहीत आहे आणि ह्मणून तिचा आतां दुसऱ्याशीं विवाह लावतां येत नाहीं. झालें तें सर्व प्रकारें धर्माला अनुसरूनच झालें आहे.

ज०—संयोगिते हा पुतळा कोणाचा आहे हें तुला पक्के माहीत आहेना ?

सं०—आतांच सर्व सभेसमक्ष मालतीनं मला त्याची पूर्ण ओळख करून दिली आहे.

ज०—आणि असं असून सुद्धां तूं त्याला माळ घातलीस अं ?

सं०—होय, मी त्यांना आपलें सर्वस्व अर्पण केलें याला ही सर्व सभा साक्ष आहे.

ज०—शिव शिव, कान कां बधीर होत नाहींत हे शद्ब ऐकण्यापेक्षां! व्यर्थ माझ्या पोटीं जन्म घेतलास. ज्याच्या राज्याची धूळधाण उडविण्याचा माझा निश्चय, ज्याचा वंशक्षय करण्याचा मी विडा उचलला, स्वहस्तानें ज्याचा कंठनाळ चिरण्याची माझी इच्छा त्याच माझ्या कट्टया शत्रूला प्रत्यक्ष माझ्या पोरीनं माळ घालून सर्वस्वी माझा आशाभंग केला! काय हा दुर्धर प्रसंग!

मा०—सरकारांनीं आतां खेद करण्याचं कांहीं कारण नाहीं. बाईसाहेबांच्या मनाला योग्य वाटून त्यांनीं ज्या वराला माळ घातली आहे—त्यांनां इथं सन्मानानं बोलावून त्यांचा मंगल विवाह उरकून टाकावा हेंच योग्य—

क०—आजच्याच सभेमध्यें ज्या मदांधाचा शिरच्छेद करण्याची मी प्रतिज्ञा केली, त्याला माझे सरकार सन्मानानं बोलावून आणणार काय? आमच्या महाराजांनां आपल्या सेवकाचा यापेक्षां खचित जास्त

अभिमान आहे. तें कांहीं नाहीं; कोणत्या तरी शास्त्राज्ञेनें संयोगितेला आपला बेत बदलविणेचं भाग पाडलें पाहिजे.

पुरो०—याला कोणतीही शास्त्राज्ञा सांपडणार नाहीं. द्रौपदीच्या स्वयंवर प्रसंगीं मोठमोठ्या ऐश्वर्यवान राजेलोकांनां सोडून तिनें यःकिंचित बटूवेषानें आलेल्या पंडुपुत्र अर्जुनाला माळ घातली, ही गोष्ट तिच्या वडिलाला रुचली नाहीं तरी त्याच्याशींच तिचा विवाह लावून देणें त्यांनां भाग पडले; तसेंच दमयंतीच्या स्वयंवराला सूर्य नारायणासारखे देवादिकसुद्धां हजर असतां बाहुकालाच तिनें माळ घातली हें सुद्धां तिच्या वडिलाला कबूल करावें लागलें. ज्या राजाला आपली मुलगी योग्य वराला वरणार नाहीं, असें वाटत असेल त्यांनीं तिला स्वयंवर करण्याची मोकळीकच द्यावयाची नव्हती.

क०—असें होणार हें जर पूर्वी माहीत असतें

तर आमच्या महाराजांनीं सुद्धां तिला स्वयंवर
दिलें नसतें. पण आतां तिला आपला निश्चय बदलून
णें सर्वस्वी भाग आहे.

श०—असें झाल्यास तें धर्मशास्त्राच्या विरुद्ध
होईल—आणि धर्म शास्त्राच्या विरुद्ध जाणें कोण
ही भूपतीला योग्य होणार नाहीं.

ज०— कांहीं चिंता नाहीं ! एकपरी धर्मशा
च्या विरूद्ध जाणें पुरवेल पण क्षत्रियांनां आपल
शत्रूस शरण जाणें कधींही खपणार नाहीं. जि
शरीर माझ्या रक्तमांसापासून बनलें आहे, जिल
वाढविण्याकरितां कैकप्रसंगीं मी आपल्या प्राणाकडेही
बघितलें नाहीं; तिला माझ्या कट्टया शत्रूनें कवटाळलेलं
मला कसं पाहवेल ! पदोपदीं शत्रूनें मानहानी केली
तरी एखाद्या निःसत्व भेकडाप्रमाणें ती निमूटपणें सह
करण्या इतका नामर्दपणा माझ्या कडून कधींही होणा
नाहीं. संयोगिते तुला आपला निश्चय बदललाच पाहिजे.

सं०—बाबा पवित्र राठोड कुलांत आणि त्यांतूनही

ाजा जयचंद्राचे पोटीं जन्म घेतलेल्या क्षत्रीय कन्येक-
ून वचनभंगाचें पातक कधींही होणार नाहीं.

ज०—पहा सांभाळ—नीट विचार करून हें उत्तर
देलंसना ? निश्चय न बदलल्यास त्या मदांधाचें तर
र्शनही होणार नाहीं, पण तूं सर्व सुखाला पूर्णपणें
आंचवशील याची तुला पक्की खात्री असूदे.

सा०—सरकार भरसभेंत वरलेल्या पतीचं दर्शन
न झाल्यास इतर कोणत्या सुखाची त्यांनां आशा
असणार ?

ज०—मग काय—झाला तुझा हाच निश्चय ?

रा० व पु०—महाराज असं करणं न्याय्य हो-
णार नाहीं.

ज०—बस्स—मी तें कांहीं जाणत नाहीं. माझा
एकवेळ निश्चय झाला त्याच्या आड कितीही संकटें
आलीं तरी तो सिद्धीस नेल्यावांचून मी कधींही राह-
णार नाहीं. बोल तुझं काय ठरलं तें ?

सं०—बाबा आपल्याप्रमाणें आपल्या कन्येः सुद्धां दृढनिश्चयी राहावं हेंच चांगलं.

ज०—ठीक आहे, भोग आपल्या कर्मांचीं फळं; सेनापती ह्या कुलटेला एकदम बंदीत टाका. आणि इच्यावर सक्त पहारा असुंद्या—माझ्या हुकमाखेरीज कोणालाही इची भेट घेऊं देऊं नका. चला ही माझ्या नजरेसमोर सुद्धां नको.

मा०—महाराज कांहीं तरी विवेक करा. राणी साहेबांच्या पश्चात आमच्या बाईसाहेबांनां सर्व कांहीं आपणच आहांत. पोराचे अपराध पोटांत घालून त्याजवर दया करणें हा आपला धर्म असून आपण असं कसं करतां ?

ज०—मला माझ्या निश्चयापुढें कांहीं दिसत नाहीं—ती आपला निश्चय बदलून माझ्या पक्षाच्या एखाद्या वराला माळ घालीपर्यंत तिला अशीच बंदीत ठेवणार. चल चालती हो इथून—[ संयोगिता, दासी व कहर-कंठीर जातात. ]

रावण—महाराजांनां आह्मी ह्मणजे एखादी गोष्ट सांगावी असें नाहीं. आपण सूज्ञच आहांत, पण आपल्या दरबारीं असा अधर्म होणें आपल्या सार्व-भौमत्वाला शोभत नाहीं.

ज०—मला त्याबद्दल फार वाईट वाटतं; पण उपाय काय ? कारटीच्या कृत्याची आठवण होतांच सर्वांगाचा नुसता भडका होतो. ह्या शुभ प्रसंगाचा अशा अशुभ रीतीनें शेवट होईल असें मला स्वप्नांत देखील वाटलें नव्हतें. तुह्मीच सांगा—खुद्द ही माझी कनोजनगरी जमीनदोस्त करण्याचा ज्याचा निश्चय, राठोड वंशाचा विध्वंस इच्छिणाऱ्या आणि प्रत्यक्ष माझ्या छातीवर गुढघा ठेऊन माझी गर्दन छाटूं इच्छिणाऱ्या माझ्या वैऱ्याशीं छातीला छाती भिडवून सामना देण्याचें सोडून—त्याच्या दरबारीं लीन होऊन मी आपली कन्या त्याला अर्पण करूं होय ! त्यानें केलेला अपमान या शूर राठोडानें एखाद्या नामर्दा-

प्रमाणें खालीं मान घालून सहन करण्याला तुम्ही कशी सल्ला देता ? यापेक्षां स्वहस्तानें आपली मान या धडावरून उतरणें, एखाद्या उंच कड्यावरून खोल समुद्रांत उडी टाकून जलदेवतांना या देहाचा बळी देणें, अगर घोर अरण्यांत क्रूर श्वापदांच्या भक्षस्थानीं पडणें काय वाईट ?

पडदा पडतो.

## अंक १ ला.

समाप्त.

---



# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

### पृथ्वीराजाचा दरबार.

[ भालदार ललकारतात. ]

लंगरीराय०—सरकार मला तर वाटतं कीं, हें सर्व शत्रूचं कुभांड असावं—संयोगितेनं महाराजांनां वरलं आहे असं आपणाला समजलं ह्मणजे अर्थात आपण तिला आणण्याकरितां कनोजास जाणार याबद्दल त्यांनां खात्री असावी, आणि असं झालं ह्मणजे महाराजावर संकट आणण्यास त्यानां कांहीं कठीण पडणार नाहीं.

आततार्ई—यांत कांहीं तथ्य नाहीं. हेरानें आणलेली बातमी खरी असावी. कारण अशा तऱ्हेची खोटी बातमी उठविण्यांत त्यांचीच मानहानी आहे. मला वाटतं कीं, जयचंद्राचें आमंत्रण महाराजांनां परत पाठवितां आलें; पण आतां त्यांच्या कन्येनं पाठविलेलं हें आमंत्रण महाराजांना स्विकारणं सवस्वी भाग आहे.

लं०—असं केल्यास कांहीं तरी धोका होणार असा माझा तर्क आहे. सेनापतीच्या ह्मणण्याप्रमाणें जर हेरानं आणलेली बातमी खरी असेल तर ती कळविण्यास फक्त आमचाच हेर कसा आला ? ज्या धैर्यशाली स्त्रीनें भरदरबारांत आपल्या पित्याच्या धाकाला न जुमानतां महाराजांच्या पुतळ्याला माळ घातली, तिनें आपल्याकडून ही बातमी दिल्लीस पोंचविण्याची कांहीं तरी तजवीज केलीच असली पाहिजे. आणि त्याप्रमाणें आपणाकडे कोणीही आलं नाहीं, यावरून हें शत्रूचं कुभांडच असलं पाहिजे.

रामगुरू०—लंगरीरायाचें ह्मणणें खरें दिसतें. अशा तऱ्हेची खोटी बातमी उठवून सरकारला कांहीं तरी पेचांत आणण्याचाच शत्रुचा बेत असला पाहिजे.

आ०—असें ह्मणणें निरर्थक आहे. आमचे महाराज शत्रुच्या राजधानीला एकटे जातील अशी त्यांची कल्पना असणें असंभवनीय दिसतें. आणि पृथ्विराज आपल्या सेनेसुद्धां तेथें गेल्यावर जयचंदानें महाराजा-

वर संकट आणणें अगदींच अशक्य. कदाचित तसेंही झाल्यास कनोजचा फडशा उडविण्यास आह्माला काय उशीर! प्रत्यक्ष कृतांतालाही शासन करणारे आमचे वीर महावीर यांनीं एकवेळ शत्रुच्या राजधानींत प्रवेश केला कीं, तेथील रमणीय राजवाडा एखाद्या स्मशानाप्रमाणें भयाण करून टाकूं—राजधानींतील मनोल्हादक उद्यानें भयानक आरण्यें होतील, आज ज्या ठिकाणीं सुंदर रोषनाई करून नाचरंगाची मजा उडत आहे त्यास्थानीं घुबडं, गिधाडं वगैरे उदासिनताप्रिय अशा प्राण्यांचे शद्ब ऐकूं येतील. आणि रजपूत वनिता आज ज्या ठिकाणीं पतीच्या सुखार्थ उत्सव करीत आहेत तीच ठिकाणें पतिनिधनवार्ता ऐकून अग्निप्रवेश करण्याकरितां त्याच युवतींच्या पेटविलेल्या चिता होतील याची पक्की खात्री असूं द्या.

पृ०—सेनापती तुमच्या शूरत्वाबद्दल आमची खात्री आहे. पण सध्यां मला वाटतं कीं श्रीकृष्णानं रुक्मिणीला ज्या प्रमाणें पळवून आणली अगर पार्थानें

सुभद्रेला जशी हरण केली त्याप्रमाणें मी एक
कनोजास जाऊन संयोगितेला घेऊन येणार.

लं०--सरकार असं करण्यानं खास आपल्या जि
वावर कांहींतरी संकट येणार.

[ जासूद येऊन मुजरा करितो. ]

पृ०--कायरे; काय खबर?

जा०--सरकार बाहेर एक स्त्री आली अ
आणि भेटीची इच्छा करीत आहे.

पृ०--काय स्त्री आली आहे ? जा, तिला ए
घेऊन ये.

( जा० जातो. )

आ०--कां ? लंगरीराय ही स्त्री कोण असा
कांहीं तर्क चालतो कां ? मी खात्रीनं सांगतो
आमच्या हेराचीच बातमी खरी आहे.

[ मालती येतें. ]

मा०--( मनांत ) मावशीकडे जाते ह्मणून निघा
तों इथवर येऊन तर पोंचेंलच, आतां महाराजांनां नेऊ

बाईसाहेबांचा विवाह ठरकला कीं संपलं माझं काम (उघड) चव्हाणकुलभूषणाचा विजय असो.

पृ०—आमचा विजय चिंतिणारांनां अभय असो. तूं आमच्या शत्रूपक्षाची असतां आमच्या दरबारांत कोणत्या कारणानं येणं केलंस.

मा०—महाराज मी आपल्या शत्रूपक्षाची खरी. पण मित्राच्या सेवेंतली होय. माझ्या धनिणीचं आपणाला एवढंच पदर पसरून मागणं आहे कीं, सरकारांनीं विलंब न करतां कनोजला येऊन त्यांनां पदरांत घ्यावं; नाहींतर भयाण तुरूंगांतच त्यांनां मृत्युमुखीं पडावं लागेल. कारण आपल्या पित्याच्या धाकाला न जुमानतां त्यांनीं भर दरबारांत आपल्या पुतळ्याला माळ घातल्यामुळें आमच्या महाराजांनीं त्यांनां बंदींत टाकलं आहे.

आ०—हें सर्व वृत्त आह्माला पुर्वींच समजलं आहे, आणि आह्मी हजारों स्वामिसेवक आपल्या धनिणीला आपल्या राजधानीस घेऊन येण्याकरितां

आपलीं शिरें हातावर घेऊन जयचंदाशीं साम
देण्यास तयार आहोंत.

पृ०—अरे ह्या स्त्रिची सर्व व्यवस्था नीट ठेव, आ
लवकरच निघण्याची तयारी करूं. [ मा० व जासू
जा.] सरदारहो ठरल्याप्रमाणें श्रीकृष्णानें रूक्मि
हरण केली त्याप्रमाणें मी एकटा आपल्या रथां
कनोजला जाणार आणि दिल्लीच्या राणीची सुट
करून तिला घेऊन येणार.

ल०—सरकार—क्षत्रीय वीराला योग्य अस
आपला बेत झाला. पण दासाची हीच विनंती आ
कीं सरकारांनीं शत्रूनगरांत एकटे जाऊं नये. जयचं
आपला कट्टा वैरी—आपल्या नाशावर टपलेला; ज
त्याची कन्या आतां सर्वस्वी आपली झाली आहे त
तिच्या प्रमाणेंच सरकाराला बंदींत टाकणं त्या
फारसं कठीण पडणार नाहीं.

आ०—लंगरीराय आपणाला इतकी धास्ती क

वाटते! अहो नरवीर पृथ्विराज, शत्रूच्या कटांत एकटे सांपडले तरी त्यांच्या केसालाही धक्का लागणार नाहीं. याची तुह्माला खात्री असूं द्या. भुजंग एकटा असला तरी हजारों मुषक त्याचा मणी घेण्यास समर्थ होतील काय ? पंचानन केसरी आपल्या गुहेंत एकटा निद्रिस्त पाहून मदोन्मत्त हत्तींना सुद्धां त्याच्याजवळ जाण्याची छाती होईल काय ? कधींही नाहीं. त्याचप्रमाणें महाराजासमोर येऊन उभा राहण्याची मुद्धां शत्रूची छाती होणार नाहीं.

ल०सेनापती आपलं ह्मणण खरं आहे. पण प्रसंगीं मोठमोठ्या वीर बहाद्दरांना सुद्धां साह्याची गरज लागते. श्रीरामचंद्राला हनुमानाची गरज लागली. गांडीवधारी पार्थ इतका बलाढ्य योध्धा, पण त्याला सुद्धां प्रतिज्ञा पूर्ण करण्यास श्रीभगवानाचें साह्य घ्यावं लागलं, त्याचप्रमाणें कोणत्या वेळेस काय प्रसंग येईल याचा मुळींच नेम नाहीं. आमच्या सरकारच्या पराक्रमाबद्दल सध्यां हें सर्व भरतखंड साक्ष देईल पण कांहीं निवडक लोक

तरी बरोबर घेतल्याशिवाय सरकारनीं कनोजला जाऊं नये.

रा०—त्यांतूनही माझं असं ह्मणण आहे कीं सरकारला आपल्या बरोबर सैन्य घेऊन जाणं रुचत नसल्यास संयोगिताहरणाकरितां सरकारची सडी स्वारी पुढें निघावी, व उदयीक सेनापती आततार्ड व इतर वीर बहाद्दर सेनेसह, जयचंद्रानें सरकारचा पुतळा दरबारांत बसवून जो सरकारचा अपमान केला त्या बद्दल सूड घेण्याकरितां कनोजवर चाल करून येतील.

आ०—ही मसलत योग्य दिसते, जयचंद्राच्या नीच कृतीनें रुधिरपानाला अधीर झालेल्या ह्या दिल्लीच्या फौजेनें कनोजवर चाल केल्यास सबंध कनोज नगरी जमीनदोस्त होण्यास उशीर काय ? सरकारच्या पसंत पडेल तर याप्रमाणें व्यवस्था व्हावी.

पृ०—ठीक आहे, ही सल्ला आह्माला पसंत आहे. रामगुरू, निघण्याची वेळ ठरवून त्याप्रमाणें आह्माला

कळवा. सेनापती तुह्मी आपली कडेकोट तयारी करा, या वेळेला तुमच्या मर्दुमकिनें शत्रूची अशी खोड मोडा कीं राठोड वंशांतील कोणत्याही राजाला चव्हाणाच्या दिल्लीकडे ढुंकून पाहण्यासही छाती होऊ नये. तुमच्या फौजेला पाहतांच त्यांनीं आपलीं तोंडें मातींत खुपसून घ्यावींत, लढाऊ घोड्यांच्या किं-काळ्या ऐकतांच रणमैदानांतून पळ काढावा, आणि तुमच्या डंका व नौबदीचा आवाज ऐकतांच प्रळयकाळ आला असेंच त्यांनां वाटलें पाहिजे कृतघ्ना जयचंदा-या पृथ्विराजाचा भरदरबारांत उपहास करतांना तुला त्याचें कांहींच भय वाटलें नाहीं काय ? अरे तुझें सैन्य माझ्या पेक्षां कितीही जास्त असलें तरी त्याचा काय उपयोग. कौरवांच्या अकरा अक्षौहिणी सैन्याचा धनजंयाच्या साऱ्या सात अक्षौहिणी फौजेनें फडशा उडविला; त्याचप्रमाणें माझ्या रणधुरंधरांनीं अस्तन्या-वर चढविल्या नाहींत तोंपर्यंतच तुमची आयुर्मर्यादा— पर्जन्य वृष्टीप्रमाणें आमच्या बाणांचा पाऊस पडला

नाहीं तोंपर्यंत तुमचा फुकट डौल टिकणार; विद्युल्य ल्लतेप्रमाणें आमच्या समशेरी बाहेर पडल्या नाहींत तोंपर्यंतच तुमच्या शस्त्रांची मात्तबरी. आणि दिल्ली च्या फौजेनें कनोजकडे मोर्चा फिरविला नाहीं, तोंप र्यंतच तुमच्या स्त्रियांचें सौभाग्य कायम राहणार यां शंका नाहीं.

आा०—सरकार त्याबद्दल आपणाला काळजी न सावी. वीरश्रीनें मत्त झालेले आमचे वीर महावी आपल्या शौर्याची पराकाष्टा करून शत्रूला मार करून महाराजाकडून शाबास शाबास ह्मणवून घे यांत कांहीं शंका नाहीं. स्वामीकार्यार्थ आपल्या आ इष्टांवर, धनदौलतीवर आणि घरादारावर पाणी सोडून आपले देह धारातिर्थी ठेवण्यास तयार झालेल्या दिल्लीच्या फौजेनें रणमैदानांत पाय ठेवतांच प्रत्यक्ष रणदेवतेनें आपल्या विमानांतून महाराजांच्या गळ्यांत आपली जयमाला घातलीच हें खास. या दिल्लीपती- च्या प्रतापसूर्याआड येऊन त्याला तेजहीन कर-

ण्यास प्रवृत्त झालेल्या या ढगांचा समूळ नाश केल्या-
वाचून आमचं सैन्य कधींही मागे हटणार नाहीं.

पृ०—ठीक आहे.

( भालदार ललकारतात. पडदा पडतो )

प्रवेश १ ला.

समाप्त.

---

## प्रवेश दुसरा.

तुरुंग

[ रामसिंव्ह पहारा करीत आहेसें
दिसतें. ]

रा०—काय दैवाची गति विचित्र आहे पहा !
...चा दिवस आह्मा कनोजनिवासी प्रजेला कोण
...ाचा जायचा ! लांबलांबचे भिक्षुकगण दक्षणेसाठीं
...त्तर आले. आमच्या महाराजांच्या एकूलत्या एक
...न्येच्या विवाह मंगळकार्यासाठीं अनेक राजेरजवाडे
...रबारांत हजर झाले. सर्व नगरींत ध्वजा तोरणें उभा-

रून चोहोंकडे आनंदोत्सवाची गर्दी उडायची. असा
राजवाड्यांत तर काय बहार उडायची पण त्यागण
ऐवजी कोणाच्या स्वप्नांत सुद्धा नाहीं अशा उदासीकरणं
नतेनें सर्वांचे चेहऱ्यांवर पगडा बसवावा अं! आमच्यांत
महाराजांनां तर दुःखानें आणि संतापानें अगदीं पुरें
करून सोडलें. ज्या राजकुमारिकेनें आपल्या सख्यांस
नटून थटून आज अगदीं मजेंत असावयाचें तिला आ
अशा या घोर किल्ल्यांत कोंडून घेण्याची पाळी यावी
अं! इश्वरेच्छा. दुसरं काय! तो ठेवील त्या स्थितींत सर्व
मानवी प्राण्यांना राहणें भाग आहे.

( पहारा करूं लागतो. मालती येते. )

मा०—[ मनांत ] आतां या पहारेकऱ्याकडून आंत जाण्याची परवानगी कशी मिळावी? द्रव्याच्या लालुचीनं कांहीं कार्य साधावयाचं नाहीं—कारण राजा जयचंद्राचे पदरीं विश्वासघातकी कधींही सांपडणार नाहींत. आमचे महाराज स्वतः वाटेल तसे वागतील पण त्यांचा आपल्या प्रजेवर आणि मांडलीकांवर

असा दरारा आहे कीं त्यांच्या हुकुमा विरुद्ध
ागण्याचं कोणाचे मनांत सुद्धां यावयाचे नाहीं. मग
करणं तर लांबच—पण कसंही करून आपल्याला
आंत तर गेलंच पाहिजे.

रा०—कोण ते तिकडे ?

( मालती उत्तर देत नाहीं )

रा०—काय ? जबाब देत नाहीं ? कोण असेल तो
ुटपणें पुढें ये, नाहींतर या रामसिंव्हाच्या तरवारी-
ा बळी पडावं लागेल याचा पूर्ण विचार कर.

मा०—कोण आहे तें पहाऱ्यावर ? ( जवळ येऊन )
ो शिपाईबुवा—आमचे रामसिंव्ह कोठ आहेत तुह्माला
ऊक आहे कां ? अहो लवकर बोला. ईश्वरा त्यांना
क्षीत ठेव.

रा०—ह्मणजे—मालती हें तूं बोलतेस तरी काय ?
सा काय रामसिंव्हावर प्रसंग आलाय ?

मा०—कोण तें ? तुह्मीच कां ? अरेरे देवा कसारे

घात केलास! अहो पळा पळा लवकर—जा घरीं निघा—अटपा——

शा०—ह्मणजे याचा काय अर्थ ?

मा०—याचा अर्थ तुह्माला घरीं जाताच समजे; अटपा—जर एका क्षणाचा विलंब केला तर तुम बायकोचं व मुलाचं प्रेतसुद्धां तुह्माला सांपडायचं न ह्मणून ह्मणते आटपा—मी आहे इथं—निघा पळा.

शा०—( मनाशीं ) माझ्या बायकोचें आणि मु चें प्रेत ? माझी बायको आणि मुलगा परगां जाऊन आज तीन चार दिवस झाले. ही म आतांच आपल्या मावशीच्या गांवाहून आली आ आणि इच्या या बोलण्यांत हटकून कांहीं तरी असलं पाहिजे. त्या खेरीज ही अशा थापा द्या लागली नसती. इच्या मनांतून बाईसाहेबांकडं आहे खास. आमची स्वामीसेवा बजाविण्याची वेळ आहे.

मा०—अहो विचार काय करतां? तुह्मी गेला नाहींत तर त्यांचं रक्षण तरी कोण करील ?

रा०—अग मी जाऊन काय करणार ? ज्या स्वामी- कार्यार्थ मी आपल्या बायकापोरांची पर्वा करीत नाहीं तेच स्वामी त्यांचं रक्षण करण्यास समर्थ आहेत.

मा०—अहो पण ही बातमी आपल्या स्वामीला पोंहोचेल तेव्हां ना ? मग जा, जा, वाड्यांत तरी जाऊन या लवकर.

रा०—पण मालती मला शोधीत येथपर्यंत आलीस तशीच आतां वाड्यांत जाऊन हें काम करीनास, हे बघ—मजवर फार उपकार होतील तुझे.

मा०—( मनांत ) मेल्यानं ओळखलं वाटतं [ उघड ] बर तर मी जाऊन तुमच्या बायकापोरांचा प्राण वाचवितें पण प्रथमतः मला माझ्या बाईसाहेबांकडे——

[ तुरुंगाच्या दरवाज्याकडे धांवत जाते ]

रा०—( तरवारीचें टोंक रोंखून तिला आडवितो ) हं खबरदार पुढें पाय टाकलास तर.

7

मा०–ह्मणजे ? हें रे काय ? मला का तूं करणार? अरे राजवाड्यांत मला कोठेंही जाण्य मनाई नाहीं–असं असून———

रा०–कसंही असो. वाड्यांत वाटेल तिकडे पण हा दरवाजा ओलांडून देणार नाहीं.

मा०–[ ओरडून ] अरे मेल्या खुद्द महाराज मला परवानगी असून तूं रे कोणत्या झाडाचा मला आडविणार ?

रा०–यापेक्षां आणखी शिव्या दिल्यास तरी महाराजांचा तसा हुकूम नाहीं.

मा०–चांडाळा–पहा बरं मी महाराजानां हें जाऊन सांगेन आणि मग मात्र पाया पडत येशील

रा०–अग एक वेळ सोडून हजार वेळ पडेन पण सध्यां तर आंत नाहीं जाऊ देणार.

मा०–हें पहा रामसिंव्ह–आतां हा विनोद सर्व द्या–पण [ त्याच्या जवळ जाते ]

रा०—हा सगळा विनोदच झाला तर [ मागे सरतो. ]

मा०—मग तुह्माला काय खरच का वाटलं ? ( पुन: जवळ जाते. )

रा०— नाहीं पण ही विनोदाची तऱ्हा कांहीं वेगळीच वर का ? [ मागे सरतो. ]

मा०—पण कायहो रामसिंह..........हो बरी आठवण झाली. आज किती दिवसापासून तरी हा कंठा तुह्माला नजर करीन ह्मणते; पण मेली संधीच आली नाहीं—हं घ्या पाहूं हा. [ त्याच्या गळ्यांत घालते. ]

रा०—( मनांत ) पक्की व्वाड आहे. इष्टकार्य तडीस नेण्या करितां काय वाटेल तें करील.

मा०—कां काय विचार चालला आहे ?

रा०—कांहीं नाहीं—ह्मटल हा कंठा ह्मणजे बाईसाहेबानीं तुला दिलेला; तेंव्हां हा आपण घेऊन काय करायचा? ( परत करतो ) तुझ्या मधूर कंठाचा प्रसाद मिळतोय तो काय कमी आहे ?

मा०—तुमची मर्जी; पण—( असे ह्मणून पुन्हां
जाते. तो मागे सरतो. तोंच ती दरवाज्याच्या कुलु
ह्मात घालते—तो पुन्हां तरवार रोंखून )

रा. ०—मालती बस्स झाला हा तुझा विनोद.
तां आपली किल्याच्या बाहेर जा पाहू.

मा०—( मनांत ) हा तर अगदींच कांहीं
देत नाहीं—आतां कसं करावं ? [ विचार करते
छे. ते कांहीं जुळायचं नाहीं—मग ? हं हं हं
छान झालं, वाड्याच्या मागच्या बाजुला जें
आहे तें थेट या तुरूंगांत येऊन ठेपलं आहे.
त्यांतूनच आपलं कार्य उरकावं. ठरला बेत.
देत नाहीं—नाहीं का ? नको जाऊं देऊस.
खुशाल शंभर वर्षं इमानानें पहारा कर हो, ( उघ
जाते बापडी—पण रामसिंह मी नांवाची मालती
वर कां. ध्यानांत ठेव.

( जाते )

रा०—अग जा, काय करत्येस पाहून घेईन.

आपले कर्तव्य योग्य प्रकारें बजावीत असतां मला कोणाचीसुद्धां भीति नाहीं.

( पहारा करू लागतो-आंतील देखावा. तलवार, चिलखत, भाला, बर्ची; शिरपेंच, तुमान, वगैरे साहित्य आंत ठेविलें आहे तोंच संयोगिता येते. )

सं---अजून आली नाही ? काय करावं आतां? पण कांहीं विपरीत तर झालं नसलनां? श्रीसोमनाथाला सर्व काळजी. तें कांहीं नाहीं; आतां येथून आपली सुटका केलीच पाहिजे. मनाचा धडा करून एकवेळ तुरूंगातून पारपडण्याचं धाडस केलं कीं झालं. खंद-काच्या पलिकडे दासीनं माझी घोडी नेऊन बांधलीच असेल; शिवाय इथंहि सर्व साहित्याची तयारी आहे. हें चिलखत, ही तरवार, हा भाला, शीरपेंच, तुमान सर्व कांहीं तयार आहे; मग उशीर कां ? तटावरून उडी मारून पार पडलें तरी ठीक, नाहींतर एकदाची सुटेन तरी या जाचांतून. आतां माझ्याच्यानं मुळींच दम धरवत नाहीं. पण याला दैव अनुकूल आहे का

पाहिलं पाहिजे. तें आतां कसं पहावं? हं
आठवण झाली. इथं माझी पोथी आहे, नव्हे
तर आतां तिच्यांतच शकून पहावा.

( पोथी काढून शकून पाहतें तोंच खालील ओ
सांपडतात )

या परी सारंगपाणी । रथीं वाहोनिया रुक्मिणी
निघता झाला तत्क्षणीं । परी प्रगटची कोणी न देखे ।
एकाएकीं वनमाळी । रथीं वाहोन भिमकबाळी
आला यादवां जवळी । पिटिली टाळी सकळिकीं ॥

[ एकदम टाळी वाजवून ]

अगवाई शकून तर असा शुभ सांपडलाय–पण म
बाई त्याचा अनुभव कधीं येणार? ती रुक्मिणी वि
मजहून केवढी दैववान म्हणायची कीं भगवंताचा ध
करण्याबरोबर श्रीकृष्ण तिच्या [डोळा लवतोसे दाखवून]
अगबाई ! शकुन तर चांगले होत आहेत. हा मा
डावा डोळा कां वरं असा एकदम स्फुरण पावतोय!
नारायणा तूं जसा रुक्मिणीच्या संकटीं धावला
तसंच या मंद भगिनीचं पाणीग्रहण पृथ्वीराज महार

जांचे हातून जर घडवून आणशील तर मी तुला सव्वा लक्ष तुपाच्या वाती लावीन. पण छे !! असल्या या कडेकोट बंदोबस्ताच्या कारागृहांत त्यांचा प्रवेश तरी होणार कसा ? छे. आता हाच एक जिवावर उदार होण्याचा उपाय दिसतोय; कारण दिल्लीहून त्यांची मार्गप्रतिक्षा करून करून माझे प्राण आतां कंठगत राहिले आहेत; तर आतां तटावरून उडी मारून जावं, हेंच उत्तम. कांहीही होवो.

[ पुरुष वेष घेऊं लागते तोंच एकदम भुयारांतून पृथ्विराज व मालती प्रवेश करितात]

मालती—हां हां. काय हें साहस? हें पहा महराज आयत्या वेळीं दिल्लीहून आले आहेत.

सं—(वेष टाकून सलज्ज. पण मनांत ) अगबाई !! खरंच देवानं माझं गाऱ्हाण ऐकून माझे शुभ शकून एकूण खरे केले ह्मणायचे ( उघड ) मालती कोणग हे?

मा॰—तें त्यांनाच विचारा; मी कशाला दोघांच्या मधे हवी ?

पृ०—मी एक प्रवासी आहे. मी तीर्थयात्रा करी करीत दिल्लीहून या ठिकाणीं आलों. या मुमुक्षु पांथस्थाची जर येथें कांहीं सोय लागली तर पहा.

मा०—बाईसाहेब! या अतिथींचा योग्य सत्कार करावा हें मी सांगायाला नकोच.

सं—भगवंता, असले सर्वांगसुंदर यात्रेकरू जर मुमुक्षु होऊन अवनीतलावर भ्रमण करूं लागले तर केवळ यांच्या दर्शनानेंहि तीर्थस्थानें पुनीत होतील मग अशांच्या निकट सहवासाचा ज्या प्राण्याला लाभ घडेल तो केवढा पुण्यवान ह्मणायचा. ( मनांत ) कायतरी हा बोलण्यांत चतुरपणा आहे पहा हे विश्वकर्म्या चतुरानना असलें हें रत्न मला लाभेल काय? केवळ चित्रपटावरून मी या स्वरूपावर मोहित होऊन त्यावेळीं राजसभेंत त्या सुवर्णमुर्तीला माळ घातली होती. आतां तर प्रत्यक्ष ती मूर्ति माझ्यापुढं उभी आहे. केवढी मी भाग्यवान!

मा०—अहो विचार काय करतां? तुम्ही गेला नाहींत तर त्यांचं रक्षण तरी कोण करील ?

रा०—अग मी जाऊन काय करणार ? ज्या स्वामी-कार्यार्थ मी आपल्या बायकापोरांची पर्वा करीत नाहीं तेच स्वामी त्यांचं रक्षण करण्यास समर्थ आहेत.

मा०—अहो पण ही बातमी आपल्या स्वामीला पोंहोचेल तेव्हां ना ? मग जा, जा, वाड्यांत तरी जाऊन या लवकर.

रा०—पण मालती मला शोधीत येथपर्यंत आलीस तशीच आतां वाड्यांत जाऊन हें काम करीनास, हे बघ—मजवर फार उपकार होतील तुझे.

मा०—( मनांत ) मेल्यानं ओळखलं वाटतं [ उघड ] वर तर मी जाऊन तुमच्या बायकापोरांचा प्राण वाचवितें पण प्रथमतः मला माझ्या बाईसाहेबाकडे——

[ तुरुंगाच्या दरवाज्याकडे धांवत जाते ]

रा०—( तरवारीचें टोंक रोखून तिला आडवितो ) हं खबरदार पुढें पाय टाकलास तर.

मा०—ह्मणजे ? हें रें काय ! मला का तूं म
करणार? अरे राजवाड्यांत मला कोठेही जाण्या
मनाई नाहीं—असं असून———

रा०—कसंही असो. वाड्यांत वाटेल तिकडे
पण हा दरवाजा ओलांडून देणार नाहीं.

मा०—[ ओरडून ] अरे मेल्या खुद्द महाराजां
मला परवानगी असून तूं रे कोणत्या झाडाचा पा
मला आडविणार ?

रा०—यापेक्षां आणखी शिव्या दिल्यास तरी
महाराजांचा तसा हुकूम नाहीं.

मा०—चांडाळा—पहा बरं मी महाराजानां हें
जाऊन सांगेन आणि मग मात्र पाया पडत येशील हो

रा०—अग एक वेळ सोडून हजार वेळ पा
पडेन पण सध्यां तर आंत नाहीं जाऊ देणार.

मा०—हें पहा रामसिंव्ह—आतां हा विनोद सर्व
द्या—पण [ त्याच्या जवळ जाते ]

रा०—हा सगळा विनोदच झाला तर [ मागे सरतो. ]

मा०—मग तुह्माला काय खरच का वाटलं ? ( पुन: जवळ जाते. )

रा०— नाहीं पण ही विनोदाची तऱ्हा कांहीं वेगळीच बर का ? [ मागे सरतो. ]

मा०—पण कायहो रामसिंह..............हो बरी आठवण झाली. आज किती दिवसापासून तरी हा कंठा तुह्माला नजर करीन ह्मणते; पण मेली संधीच आली नाहीं—हं ध्या पाहूं हा. [ त्याच्या गळ्यांत घालते. ]

रा०—( मनांत ) पक्की लबाड आहे. इष्टकार्य लडीस नेण्या करितां काय वाटेल तें करील.

मा०—ह्मां काय विचार चालला आहे ?

रा०—कांहीं नाहीं—ह्मटल हा कंठा ह्मणजे बाई-साहेबानीं तुला दिलेला; तेव्हां हा आपण घेऊन काय करायचा? ( परत करतो ) तुझ्या मधूर कंठाचा प्रसाद मिळतोय तो काय कमी आहे ?

मा०—तुमची मर्जी; पण–( असे ह्मणून पुन्हां जवळ जाते. तो मागे सरतो. तोंच ती दरवाज्याच्या कुलूपाला हात घालते–तो पुन्हां तरवार रोंखून )

रा. ०—माळती बस्स झाला हा तुझा विनोद. आतां आपली किल्याच्या बाहेर जा पाहू.

मा०–( मनांत ) हा तर अगदींच कांहीं चा देत नाहीं–आतां कसं करावं ? [ विचार करते ] छे. ते कांहीं जुळायचं नाहीं–मग ? हं हं हें मात्र छान झालं, वाड्याच्या मागच्या बाजुला जें भुयार आहे तें थेट या तुरूंगांत येऊन ठेपलं आहे. तेव्हां त्यांतूनच आपलं कार्य उरकावं. ठरला बेत. जाऊं देत नाहीं–नाहीं का ? नको जाऊं देऊस. आतां खुशाल शंभर वर्षे इमानानें पहारा कर हो, ( उघड ) जाते बापडी–पण रामसिंह मी नांवाची माळती आहे बर कां. ध्यानांत ठेव.

( जाते )

रा०–अग जा, काय करत्येस पाहून घेईन. मी

आपले कर्तव्य योग्य प्रकारें बजावीत असतां मला कोणाचीसुद्धां भीति नाहीं.

( पहारा करू लागतो-आंतील देखावा. तलवार, चिलखत, भाला, बर्ची; शिरपेंच, तुमान, वगैरे साहित्य आंत ठेविलें आहे तोंच संयोगिता येते. )

सं---अजून आली नाही ? काय करावं आतां? पण कांहीं विपरीत तर झालं नसलनां ? श्रीसोमनाथाला सर्व काळजी. तें कांहीं नाहीं; आतां येथून आपली सुटका केलीच पाहिजे. मनाचा घडा करून एकवेळ तुरूंगातून पारपडण्याचं धाडस केलं कीं झालं. खंदकाच्या पलिकडे दासीनं माझी घोडा नेऊन बांधलीच असेल; शिवाय इथंहि सर्व साहित्याची तयारी आहे. हें चिलखत, हीं तरवार, हा भाला, शीरपेंच, तुमान सर्व कांहीं तयार आहे; मग उशीर कां ? तटावरून उडी मारून पार पडलें तरी ठीक, नाहींतर एकदाची सुटेन तरी या जाचांतून. आतां माझ्याच्यानं मुळींच दम धरवत नाही. पण याला दैव अनुकूल आहे का

पाहिलं पाहिजे. तें आतां कसं पहावं? हं ांचे
आठवण झाली. इथं माझी पोथी आहे, नव्हे ला
तर आतां तिच्यांतच शकून पहावा. मसल
( पोथी काढून शकून पाहतें तोंच खालील ओव्यांच
सांपडतात ) ाच
या परी सारंगपाणी । रथीं वाहोनिया रुक्मिणी फार
निघता झाला तत्क्षणीं । परी प्रगटची कोणी न देखे ाझे
एकाएकीं वनमाळी । रथीं वाहोन भिमकबाळी टा
अशा यादवा जवळी । पिटिली टाळी सकाळिकी ॥ वे

[ एकदम टाळी वाजवून ]

अगबाई शकून तर असा शुभ सांपडलाय–पण म
बाई त्याचा अनुभव कधीं येणार? ती रुक्मिणी वि
मजहून केवढी दैववान ह्मणायची कीं भगवंताचा प्र
करण्याबरोबर श्रीकृष्ण तिच्या [डोळा लवतोसे दाखवू
अगबाई ! शकुन तर चांगले होत आहेत. हा
डावा डोळा कां बरं असा एकदम स्फुरण पावतोय एक
नारायणा तूं जसा रुक्मिणीच्या संकटीं धावला
तसंच या मंद भगिनीचं पाणीग्रहण पृथ्वीराज महा

यांचे हातून जर घडवून आणशील तर मी तुला सव्वा लक्ष तुपाच्या वाती लावीन. पण छे !! असल्या या कडेकोट बंदोबस्ताच्या कारागृहांत त्यांचा प्रवेश तरी होणार कसा ? छे. आता हाच एक जिवावर उदार होण्याचा उपाय दिसतोय; कारण दिल्लीहून त्यांची मार्गप्रतिक्षा करून करून माझे प्राण आतां कंठगत राहिले आहेत; तर आतां कोटावरून उडी मारून जावं, हेंच उत्तम. कांहींही होवो.

[ पुरुष वेष घेऊं लागते तोंच एकदम भुयारांतून पृथ्विराज व मालती प्रवेश करितात]

मालती—हां हां. काय हें साहस? हे पहा महराज आयत्या वेळीं दिल्लीहून आले आहेत.

सं—(वेष टाकून सलज्ज. पण मनांत ) अगबाई !! खरंच देवानं माझं गाऱ्हाण ऐकून माझे शुभ शकुन एकूण खरे केले ह्मणायचे ( उघड ) मालती कोणग हे?

मा०—तें त्यांनाच विचारा; मी कशाला दोघाच्या मधे हवी ?

पृ०—मी एक प्रवासी आहे. मी तीर्थयात्रा क
करीत दिल्लीहून या ठिकाणीं आलों. या
पांथस्थाची जर येथें कांहीं सोय लागली तर पहा.

मा०—बाईसाहेब! या अतिथींचा योग्य सत्का
करावा हें मी सांगायाला नकोच.

सं—भगवंता, असले सर्वांगसुंदर यात्रेकरू
मुमुक्षु होऊन अवनीतलावर भ्रमण करूं लागले त्य
केवळ यांच्या दर्शनानेंहि तीर्थस्थानें पुनीत होती
मग अशांच्या निकट सहवासाचा ज्या प्राण्या
लाभ घडेल तो केवढा पुण्यवान ह्मणायचा. ( मनांत
कायतरी हा बोलण्यांत चतुरपणा आहे पहा
हे विश्वकर्म्या चतुरानना असलें हें रत्न मला लाभे
काय? केवळ चित्रपटावरून मी या स्वरूपा
मोहित होऊन त्यावेळीं राजसभेंत त्या सुवर्णमुर्ती
माळ घातली होती. आतां तर प्रत्यक्ष ती
मूर्ति माझ्यापुढं उभी आहे. केवढी
भाग्यवान !

पृ०—मग कसं काय; या पांथस्थाची आपण
ाय सोय लावणार?

सं०—( मालतीकडे पहात ) अग, पण पांथ-
थानीं देवळांराऊळांत उतरायचं तें सोडून या
ारागृहांत काय ह्मणून यायचं बाई?

पृ०—हे कान्यकुब्जराजसुते, मी कांहीं निरा-
ळ्याच पंथाचा यात्रेकरू आहे.

सं०—( मालतीस ) ह्मणजे काय?

पृ०—भगवान कुसुमायुधाचा मी एक अत्यंत
ोर अपराध केला व त्याच्याच आज्ञेवरून त्या
ापशमनार्थ या महातीर्थाकडे धांव घेतली.

सं०—अगबाई ! पण इथं देवदेवी कुठून आली?

पृ०—प्रत्यक्ष कामदेवानेंहि जिची सदैव आराधना
करावी अशी ही सौंदर्यदेवी येथें वास करीत
असतांना, बिचारे मूढ यात्रेकरू भलतीकडेच भटक्या
ारीत फिरतात, हें त्यांचं केवढं अज्ञान?

सं०—पण या कारागृहांत मी या पांथस्थाची

सोय तरी काय करावी? मालती तूं तरी मला

मा०—त्यांचं जें इच्छित असेल ती भिक्षा देऊन संतुष्ट करावं ह्मणजे झालं.

पृ०—हे दैववान कारागृहा !! तुझी केवढी महान् तपश्चर्या ह्मणायची! असल्या या भुवनैक बंदीवानाचा तुला रात्रंदिवस सहवास घडत धन्य आहेस तूं खास!! असल्या या मोहक बंदिवाना उपासक होण्यासाठीं सव्वा मणाची श्रृंखला मला सोसावी लागली तरीहि मी तिला तृणालमालेस मोठ्या आनंदानं सुखावह मानीन. ( संयोगितेस हे भुवनैक देवी !! या भक्ताकडून कोणती घेण्याचा संकल्प आहे ?

सं०—कायतरी बाई हा उलट सेवा घेण्या मार्ग आहे पहा? मला नाहीं बाई असलीं खोल बोलणीं समजत? देवीच्या उपमेला तरी शोभण्य जोगी मी आहे कां? उगीच आपलं एखा पाषाणाला देव ह्मणावं झालं!

मा०—बाईसाहेब ! महाराज दिल्लीहून आपणा-साठीं एवढे टाकोटाक मजल दरमजल करीत आले आहेत तर आतां हा विनोद पुरे झाला.

सं०—अगबाई पण, मी कुठं दिल्लीहून इकडं यायला बोलावणं केलं होतं?

पृ०—छे: ह्मणतो कोण ? भक्ताला आराध्य देवतेच्या निमंत्रणाची अपेक्षा असते. ते स्वयंभक्तीनेंच येत असतात. बरं पण आतां आमच्या बरोबर दिल्लीला केव्हां येणार. येथें एकही क्षण दवडून उपयोग नाहीं, कारण ही जागा फार भीतिप्रद आहे. चोरट्या भुयारांतून ज्या वाटेनं आह्मी आलों त्याच वाटेनं बाहेर लवकर पडलं पाहिजे. तिकडे माझं सैन्य वाट पाहत असेलच.

( संयोगिता माळतीच्या कानांत गांधर्वविधीचें साहित्य आणण्यास सांगते व ती जाते ).

पृ०—काय तरी कावेबाजपणा ! ह्मणे मी कुठे दिल्ली-हून बोलावलं; तर मग आह्मी आपले आगंतुकचना

एकूण ? तरी पण असली ही दिव्य भिक्षा मि
साठीं आगंतुकी तरी करण्याचं कोणाच्या न
आहे? हें विधात्या तूं धन्य आहेस झालं. मला वा
जगांतील प्रत्येक मोहक व सुंदर वस्तु, तूं हेंच
चित्र पुढं ठेऊन निर्माण केली असशील व बहुतेक
व्यासंगा मुळें तुला जरठत्व आलं असेल. पण या प्र
काळच्या गार वाऱ्यानं केस किती तरी विखरले आ
पहा. ( तिच्या तोंडावरून हात फिरवतो. ) अहा
या एका अंगस्पर्शात जो ब्रह्मानंद आहे तो, यो
लाही मिळत असेल त्याहून सहस्रपट अधिक
काय तरी हा जयचंद अरसिक आहे पहा, कीं
हें मालतीचं कोमल पुष्प त्यानें अशा कांटेरी जाग
टाकलं आहे. ( तिची हनुवटी धरतो ) आजची
अमावास्येची रात्र असतांना हा कौमुदी प्रकाश
मिळत आहे.

सं०—अगबाई—पण विधिवत् पाणिग्रहण हो
पूर्वीच हा अंगस्पर्श शोभतो कसा ?

पृ०—इतकेंच ना—तर मी आतां पाणिग्रहणच करतो ह्मणजे झालं ना ?

सं०—या चतुरपणापुढें काय बाई आतां जास्ती बोलावं ?

( इतक्यांत मालती साहित्य घेऊन येते. )

मा०—पहाऱ्यावर मानसिंग किंचित झोपेंत गुंगत पडला आहे; बाहेर अंधार काळाकिट्ट आहे; तर आतां लवकरच गांधर्वविधि उरकून वेषांतर करून बाहेर पडा. मी तीन घोडे तयार करून ठेवतें.

( संयोगिता पृथ्वीराजाच्या कपाळीं तिलक लावून उभयता हातीं कंकण बांधतात. व एकमेकांच्या गळ्यांत माळ घालतात. )

पृ०—हे सर्व साक्षी पृथ्वीचालका ! हे अष्टदिक्पालानों! तुह्मा सर्वांना साक्षी ठेऊन मी आज या जयचंद्रकन्यारत्नाचं पाणिग्रहण करीत आहे तर आमचा गांधर्वविधि मंगलकारक होवो.

सं०—द्वारकाधीशा श्रीकृष्णा मी तुला नवस केल्या-

प्रमाणें लवकरच सव्वा लक्ष वाती लावीन.

पृ०—प्रिये तूं आतां पुरुषाचा वेष कर व सा होऊन आपण बाहेर पडूं. आटप लवकर. हा मध्यरात्रीचा चौघडा झडूं लागला.

सं०—जशी आपली आज्ञा. आई अंबाबाई; आमची पाठराखीण तूंच ! पण मला थेट दिल्लीला नेणार?

पृ०—उघडच आहे. मी माझे पंचप्राण आपण पासून दूर कसे ठेवूं.

( जातात )

दुसरा प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश ३ रा.

जयचंदाचा खलबत-

खाना-[ जयचंद बसला आहे. ]

ज०—रात्र आणि दिवस मिळून आठी प्रहर काळजीत काढावे लागतात. राजा सारखे सुखी

कोणीच नाहींत, असें ह्मणणाऱ्या लोकांनां जगाचा अनुभव फारच कमी असं ह्मणावं लागतं. माझ्याकडेच पहा. ईश्वराच्या कृपेनें राज्य प्राप्त झालं, आणि तेंही सार्वभौम. अलोट संपत्ति, पूर्ण ऐश्वर्य आणि वाटेल तें करण्याची सत्ता या सर्व गोष्टी अनुकूल आहेत; पण मनाला आनंद कशापासूनही होत नाहीं. आणि तो तरी कसा व्हावा? अशा वयांत अर्धांगी पत्नीचा वियोग व्हावा ही केवढ्या दुःखाची गोष्ट! त्यांतून पोटीं पुत्र नसल्यामुळें, येवढ्या या अफाट राज्याची पुढें काय वाट होईल ह्या चिंतेनें मनाला सारखी तळमळ लागलेली; तशांत मी संयोगितेकडे पाहून त्यांतल्यात्यांत समाधान मानून घेत होतों. आणि पोरगी चांगल्या वराला मिळाली ह्मणजे जावाईबुवाना ही सर्व राज्यलक्ष्मी अर्पण करून आपण काळजींतून मुक्त होऊं अशी मला फार आशा होती—पण या कपाळकरंटीनें आपल्या दुष्ट कृतीनें माझ्या सौख्याशेवर पाणी सोडावयास लावून मला सर्वस्वी नागवून टाकलं. असली दिवटी

मला देवानीं का दिली, कांहीं समजत नाहीं ! मागच्या जन्मीं असं माझ्या हातून कोणतं भयंकर पातक घडलं होत ? शिवशिव, नको नको या गोष्टीचा विचार सुद्धां करणं नको. ( कहरकंठीर घाईघाईनें येतो. ) का काय खबर.

क०—महाराज पृथ्वीराजाच्या सैन्यानं अगदीं जवळच छावणी दिली आहे. ही मला आतांच खबर पोंचली.

ज०—ठीक आहे. आमच्या फौजेला एकदम तयार होण्याचा इषारा द्या. घोडेस्वारांना अघाडी धरू द्या भालेवाले गोलंदाज यानीं मध्यें राहावें आणि इतर पायदळ सैन्य मागच्या बाजूला ठेवा. चला पाहतां काय ? कनोज शहरावर चाल करणाऱ्या या भामट्यांनां पिटाळून द्या. मेघांच्या गडगडाटा प्रमाणें बंदुका झडूंद्या. पर्जन्य वृष्टीप्रमाणें बाणांचा पाऊस पाडा छातीला छाती भिडवा आणि यांचा असा खरपूस समाचार घ्या कीं पुन्हां कनोज शहराचं नांव घेतां

यांच्या छातींत धडकीच भरावी. कोण आहेरे तिकडे?
माझा हत्ती तयार करा.

क०—खुद्द महाराजांनीं इतके श्रम घेण्याचं कांहीं कारण नाहीं. भर दरबारांत घेतलेल्या शपथेतून मोकळा होण्याची ही सुसंधी मला मिळाली आहे; तिचा लाभ मलाच घडावा अशी माझी फार उत्कंठा आहे. महाराजांनीं दासाच्या विनंतीला या वेळेस मान द्यावाच अशी प्रार्थना आहे. आपल्या पुण्याइनें याच वेळेस पृथ्वीराजाचं शीर आमच्या वाड्या समोरच्या बुरजावर लटकाऊन देईन. त्याच्या सैन्यांतील एकही मनुष्य त्याच्या मरणाची वार्ता दिल्लीस पोंचविण्यास जिवंत ठेवीत नाहीं; आणि जिकडे तिकडे अशी धुमाकूळ माजवून सोडतो कीं या राठोडांच्या विजयाचं सर्व अबालवृद्धानां अनेक वर्षें स्मरण राहील.

ज०—ठीक आहे—या वेळेस सर्व भिस्त तुह्मावर ठेवतो. चला क्षणाचाही विलंब लावूं नका. इकडे हा सूर्योदय होतोय तोंच तुमच्या प्रतापसूर्याचा उदय

होऊं द्या; अटपा.

क०—घेतो तर आज्ञा. ( क. जातो. )

ज०—कहरकंठीरासारखा शूर मर्द विजयश्रीचीसा संपादन केल्या शिवाय रणमैदान कधींही सोडणे नाहीं; याची मला पूर्ण खात्री आहे. अहाहा! या लढाईंत जर माझ्या शत्रूचा नाश झाला तर या दाला सबंध हिंदुस्थानांत शत्रू म्हणून उरणारच ना आणि मग ही उर्मट कारटीही आपला निश्चय सोडीत नाहीं हें पाहतो.

पडदा पडतो.

प्रवेश तिसरा समाप्त.

---

# प्रवेश चवथा.

स्थळः—कनोज शहरा बाहेरील मैदान.

( रणावेश चढलेला पृथ्विराज व लंगरीराय प्रवेश करितात. )

पृ०—शाबास ! वीरा शाबास !! आपल्या माते

कष्ट दिल्याचं सार्थक केलंस. वाहवारे माझ्या भाततांई. जसा श्रीरामसेनेचा पुढारी हनुमान तसाच या पृथ्वीराजाला तूं. लंगरीराय पहा तो रणदेवतेचा लाडका पुत्र त्या राठोड सैन्याला कसा भराभर मुक्ती देतो आहे. एकाची सुद्धां त्याच्यासमोर येण्याची छाती होत नाहीं. माझ्या आततांइनं या सर्वांच्या गर्वाचं चांगलं खंडण केलं अहाहा काय हे धुराचे लोट. यानीं तर आकाश-पाताळ एककरून सोडलं. तसेंच ह्या रुधीरप्रवाहानीं हें रणमैदान अगदीं लाल करून सोडलं. मांसाचा चिखल इतका झालाय कीं घोड्यांना निटपणें चालतां देखील येत नाहीं आणि प्रेतांचे एवढाले ढीग पडलेत कीं शत्रुसेना पराजीत झाल्यावर त्यांना त्या ढीगांच्या आड खास लपतां येईल. शाबासरे शाबास, माझ्या आततांई.

लं०—महाराज तो पहा शत्रूपक्षाच्या घोड्याच्या मोठ्या ऐटीनं हातांत समशेर फिरवीत फिरवीत

कोणबरें पुढं सरसावला ?

पृ०—अरे हाच त्या मदांध जयचंदाचा गर्विष्ठ सेनापती. विरानों पहाता काय ? करा एक निकराचा हल्ला आणि घाला या कहरकंठीरला कंठस्थान. पण हा पहा, मत्तगजाचं गंडस्थळ फोडण्यास उत्कंठीत झालेला सिंहाचा छावा पुढं सरसावला. आततायी धन्य तुझी माता कीं जी अशा वीरशिरोरत्नाला प्रसवली. पहापहा तो अगदीं त्याच्या जवळ जाऊन ठेपला. लंगरीराय माझ्या तरूण वीराचा पराक्रम पाहण्याची ही पर्वणी मी इथेंच उभा राहून घालविणार नाही. पण हें पहा त्याच्या भोंवती किती शिपाई जमले. आतां तर मला कांहींच दिसत नाहीं. या वेळेला दोन्ही पक्षाचे ए.क अगदीं हातघाईवर आले. अगदीं घोड्याला घोडा टेंकून भाला फेकण्यालाही पुरेसें अंतर राहिलें नाहीं.

लं०—महाराज पण हा समोरून धांवत कोण येतो आहे पहा? मला वाटतं हा आततायीच्या शिपा-

यापैकींच एक असावा.

पृ०—काय ? धांवत येतोय. मग आततताईच्या विजयाचीच वार्ता यानें आणली खास. (जासूद येतो) कायरे, काय खबर?

जासूद—सरकार, सेनापती पडले आणि आपल्या सेनेंत एकच घोटाळा उडून ती धावूं लागली.

पृ०—काय ? पृथ्वीराज जिवंत असतां त्याची सेना पळूं लागली ? मुर्खा किती खोटी बातमी आणलीस ही.

लं०—हाय—हाय—शूर सेनापती इतक्यांतच—

पृ०—लंगरीराय त्याबद्दल शोक करण्याची ही वेळ नव्हे आणि शोक तरी कां करा? वीराला योग्य असेच त्याला मरण आल्यामुळें त्या पहा स्वर्गस्थ अप्सरा आपल्या दिव्य विमानांत त्याला घेऊन जाताहेत. असा मृत्यु येणं फार कठीण. जें स्थान मिळण्यासाठीं मोठमोठ्या तापसी लोकांना अनेक तपेच्च्यातपें रानावनांत तपश्चर्या करावी लागते तें स्थान

आहा क्षत्रियांनां लढतालढता मरण आल्यानें प्राप्त होतें, मग घरांतील बिछान्यावर घाणेरड्या रोगानीं कुजून कुजून मरण्यापेक्षां हें मरण कोणता रजपूत नको ह्मणेल. चला; अरे माझा धनुष्य आण, घोडा तयार कर आणि तूं पुढें होऊन माझ्या येण्याची वर्दी दे. डंका, नौबती, नगारे, भेरी आणि रणशिंगं यांच्यायोगानें तिन्हीलोक दणागून टाका. आतां जर कोणी आपलें पाऊल मागें घेतलें तर तावडतोब त्याचा शिरच्छेद करा.

[ पुरुष वेशानें मालती येते. ]

मा०–सरकार त्या पाहिल्यांत कां आमच्या बाईसाहेब, महिशासुरमर्दिनी जगदंबेप्रमाणें उग्र स्वरूप धारण करून आपल्याच पित्याच्या सैन्याचा संहार करीत आहेत.

पृ०–खरंच धन्य आहे ती. अशा धैर्यशाली शूर स्त्रिया जोंपर्यंत या आर्यभूमीवर हयात आहेत तोंपावेतों तरी आमच्या राज्यलक्ष्मीला खास

धोका नाहीं; पण तिच्या संरक्षणार्थ कोणीच कसे नाहीं? लंगरीराय चला आपलें शस्त्र सज्ज करा आणि—

लं०—पण महाराज सांभाळा हे पहा शत्रूसैन्य इकडेंच लोटलं.

पृ०—मला कशाला येवढा त्याचा डर? हा पहा धनुष्य सज्जकरून त्यांना यमपूरीचा भाग दाखविण्यास मी तयार झालों.

[ कहरकंटीर आवेशानें पुढें येतो. मागावून दोन्हीं पक्षाचे कांहीं लोक येतात. ]

क०—कुठं आहे तो मदोन्मत्त पृथ्वीराजा? नीचा तुझ्या सेनापतीसुद्धां इतर सैन्याचा फडशा उडवून अखेरीस तुझ्या रक्तानं या समशेरीला शांत करण्याकरितां हा पहा तुझा काळ तुला शोधीत आला आहे.

पृ०—तूं काळ आहेस, कां काळाला शोधीत आला आहेस, हें तुला लवकरच समजेल. जयचंदासारख्या दुष्ट राजाचा सेनापति स्वर्गलोकीं गेल्यास

त्याला नर्कांत पडावें लागेल हें जाणून परोपकार बुद्धीनें तुझा नर्कवास टाळण्याकरितां आतताई पुढें गेला आहे आणि ज्यापक्षीं तूं आतां आपण होऊन काळाचा उंबरठा ओलांडला आहेस त्यापक्षीं तुझीही घटका भरलीच ह्मणून समज.

क०—अरे राजा जयचंदाचा अपमान करण्यास प्रवृत्त झालेल्या तुझ्यासारख्या उर्मटाला स्विकारण्यास मृत्युला देखील लाज वाटेल.

पृ०—आणि ह्मणूनच आपल्या सारख्या त्यांच्या प्याऱ्या दोस्ताचें तो मोठ्या खुशीनं स्वागत करील.

ज०—महाराज आपण कशाला या माकडाशीं भाषण करितां. ह्या सेवकाला आज्ञा द्या कीं आत्ताच्याआता याचे तुकडे करतो- कृतघ्ना ते पहा गृध्रादि मांसहारी पक्षी तुझ्या प्रेतावर ताव मारायला उतावीळ झाले आहेत आणि तूं आतां लवकर स्मशानांत त्यांच्या सोबतीला जाणार ह्मणून ती पहा

भूतें, हडळी, आणि खवीस आनंदानें नाचूं लागलीं आहेत. ( तरवार उपसून सज्ज होतो. )

क०—वारे स्वामीसेवक ! आपण मध्यें शिरल्यास आपल्या स्वामीचा अंतःकाळ तेवढाच लांबणीवर पडेल असं जाणून—

पृ०—अरे भेकडा ह्या वल्गना आता पुरे कर. काय तुझ्या तरवारींत सामर्थ्य आहे तें दाखीव, मात्र आपल्या जिवाची आशा सोडून पुढें पाय टाक कारण प्रत्यक्ष कृतांतालाही शासन करणाऱ्या पृथ्विराजासमोर उभा आहेस हें विसरूं नकोस. या दिल्लीपतींच्या समोर आलेल्या एकाही शत्रूस आजपर्यंत प्राण बचाविता आले नाहीं.

क०—अरे पण त्याच दिल्लीपतीला आतां आपला स्वतःचा प्राण वाचविणें कठीण पडेल; कारण या कहरकंठीरची समशेर समोर असलेल्या शत्रूचं रक्तप्राशन केल्याखेरीज कधींही शांत होणार नाहीं.

लं०—शंढा उगीच बडबड करून मरणकाळ लांबणीवर टाकूं नकोस. चल, हो समोर.

( दोघे लढतांलढतां लंगरिराय मरतो. त्यास पृथ्विराजाचे लोक नेतात. तोंच पृथ्विराज चवताळून पुढें सरसावतो व कहरकंठीरच्या पायावर वार करितो. तो पृथ्विराजाच्या शिरावर पडतां पडतां वार करणार तोंच संयोगिता पुरुष वेषानें येऊन कहरकंठीरचा हात तोडते. दोन्ही पक्षाचे लोक निकरावर येतात. त्यांत पृथ्विराजाचे लोक शत्रूच्या सर्व लोकांना हांकून देत देत घड्यांत जातात. )

पडदा पडतो.

## अंक २ रा

समाप्त.



# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

( दिल्लीच्या राजवाड्यांत पृथ्विराज, संयोगिता व मालती बसली आहेत )

पृ०—पण मला वाटतं कीं आपण होऊन आतां पुनः कनोज शहरावर स्वारी करायचीच नाहीं.

सं०—[ विनोदानें ] इतकी कां राठोड राजानें दिल्लीपतीची खोड मोडली ?

पृ०—यापेक्षां ती आणखी काय राहिली? जयचंदानीं आमचे दोन वीर बळी घेतले ते निराळेच पण तेवढ्यानेहि त्याचं समाधान झालं नाहीं ह्मणून हा एवढा मोठा वीरबहाद्दर खुद्द पृथ्वीराजाला पराजीत करायला धाडला आहे.

सं०—उगीच कांहींतरी बोलायच, झालं!

पृ०—उगीच कसलं ? तुह्मीच पहा; कीं ज्या पृथ्विराजानं आजपर्यंत आपल्या शरांनी अगणीत

वीरांना हतवीर्य करून टाकलं; त्याच पृथ्विराजाला आज या वीराच्या नेत्रकटाक्ष शरांनी अगदीं जर्जर करून टाकलं; आहे तसंच ज्या या पृथ्विराजाची फक्त कपाळाची आंठी नजरेस पडल्याबरोबर बलाढ्य शत्रूंनीहि गर्भगळीत होऊन जावं; त्याच या पृथ्वि· राजाची या तरुण वीराची मुद्रा थोडीशी रोषयुक्त होतांच पाचावर धारण बसते.

सं०–पण हें सर्व पदरी घेणं झालं ह्मणूनच ना? नाहींतर—

पृ०–नाहींतर काय ?

सं०–कांहीं नाहीं. उगीच अशी पोकळ थोरवी देण्यांत काय मौज वाटते कोण जाणे ?

पृ०–वाः आतातर आमची सारी यातच मौज आहे. दुसरा कोणता उद्योग आहे?

मा०–बाईसाहेब, असं असेल तर राज्यकारभार आतां आपल्यालाच चालवावा लागेल.

पृ०–असं होईल तर आणखी काय पाहिजे? आह्मी

तर असल्या परोपकारी राणीच्या राज्यांत मोठ्या चैनींत दिवस काढणार.

सं०—हें पहा मालती, अशा वाक्पंडिता पुढं तुझं बाई काय चालणार ?

पृ०—पण आता मात्र आह्माला जीभ अवरावी लागणार.

सं०—कारण वेडगळाशीं उगीच कोण भाषण करणार ?

पृ०—तरीपण असे वेडगळ दुसऱ्यासच वेडे करून सोडणार.

सं०—अगोदर कुणी कुणाला वेडं केलं होतं याची साक्ष कनोजास भरलेला दरबार देईल ह्मटलं.

पृ०—यावर कांहीं आह्माला उत्तर सुचत नाहीं. खरोखर ऐन तोफेच्या माऱ्यांत एखादा वीर पुढें सरसावेल पण स्त्रियांच्या जिव्हे पुढें कोणाच्यानेहि टिकाव धरवणार नाहीं हेंच खरं.

( मालती संयोगिते जवळ विड्याचें तबक व

पुष्पहार देते. ते संयोगिता पृथ्विराजास देते.)

[ इतक्यांत एक जासूद येतो. ]

जा०—सरकार रामगुरु बाहेर आज्ञेची वाट पह

आहेत.

पृ०—काय? इतक्या रात्रींचे ते आले आहे

जा, त्यानां लवकर आंत घेऊन ये.

[ जासुद जातो. ]

सं०—काय बरं इतक्या जरूरींचं काम असा

मला वाटतं कीं कहरकंठीरच्या मरणानं चवता

गेल्यामुळें स्वतः बाबा दिल्लीवर चालून आले असत

देवा अशी दुर्बुद्धी त्यानां कधींही देऊं नकोस.

[ जासूद व रामगुरु येतात. ]

पृ०—रामगुरु इतक्या रात्रीचं कां येणं केलंत?

रा०—सरकार तशीच कांही महत्वाची ब

देण्यास आलो आहे.

पृ०—ती कोणती ?

रा०—हीच कीं शहाबुद्दीन घोरी पुन्हां हिंदु

नांत शिरला असून त्याच्या सैन्यानें चोहोकडे धुमाकूळ चालविली आहे. आणि वाटेंत कांहीं रजपूत राजांचा मोड करून त्यानें आपला दिल्लीकडे रोंख लावला आहे. कांहीं गांवेच्या गावें त्यानी जाळून उध्वस्त करून टाकलीं, देवस्थानें जमीनदोस्त केलीं, त्याच्या तडाक्यांत सांपडलेल्या हिंदू लोकांची त्यानें फार क्रूरपणानें कत्तल केली, अनेक स्त्रियांनां बाटवून दासी केल्या आणि लहान पोराबाळांची सुंता करवून त्यांना महंमदी धर्माची दिक्षा दिली आहे.

पृ०–( रागानें पुढें येऊन ) हीं सर्व अमानुष कृत्यें करताना दिल्लीपति पृथ्विराजाचें त्याला मुळींच भय वाटलें नाहीं काय? अरे हा पृथ्विराज जिवंत आहे तोंपर्यंत या आर्यभूमिला पठाणांचा विटाळही होऊं देणार नाहीं. आमच्या सुवर्णभूमिचे वैभव पाहून पठाणांच्या तोंडाला पाणी सुटलें हें रास्तच पण अशा अगणित पठाणानां अल्लाच्या घरीं पाठविणारे शूर आर्यपुत्र सध्यां जिवंत आहेत हें त्यांना कसें समजत नाहीं! सेनापति, आतांच्या-

आतां सर्व हिंदु राजाकडे सांडणीस्वार रवाना करा आणि त्यांना या देशाची लाज राखण्या करितां आपल्या प्राणांचेही बळी देण्यास तयार व्हा असा निरोप पाठवून लवकर आपल्या फौजे सुद्धा दिल्लीस बोलवा; तसेंच राजा जयचंदाकडे तुह्मी स्वतः जा, आणि त्यांना माझा असा निरोप कळवा कीं आपापसांतील वैरभाव विसरून जाऊन ह्या वेळेला आपण आपल्या सेनेसह आह्मांला मदत करावी. कारण ह्या वेळेस आपापल्या गृहकलहाकडे लक्ष देऊन स्वस्थ बसणें हे अनार्यत्वाचें लक्षण होईल. ज्या प्रमाणें एका मातेचं लेकरें दिवसांतून अनेक वेळ तंटें करतात पण दुसरा ज कोणी त्यांच्याशीं भांडण्यास आला तर ते स्वाभावि प्रमानेंच एक होऊन त्याच्याशीं सर्व मिळून भांडण्या तयार होतात त्याचप्रमाणें आपण सर्व एका आर्य मातेचे पुत्र आहोंत आपलें गृहकलह कितीही वाढले असले तरी या प्रसंगीं आपण एकदिलानें आपल्या वर चालून येणाऱ्या परकीय शत्रूस पिटाळून लावणें

हेंच आह्मा आर्यांचें खरें ब्रीद. आर्यांचें आर्यत्व हिराऊन नेण्यास, सर्व हिंदूना महमदी धर्म देण्यास, आह्माला अत्यंत पूज्य अशा आमच्या देवालयांचा विध्वंस करून मूर्तीचा भंग करण्यास आणि या आर्य-जननीचें सौभाग्य आणि वैभव हरून आह्माआर्य-पुत्रांनां परतंत्रतेच्या शृंखलेनें बद्ध करूं पाहण्यास प्रवृत्त झालेल्या या पठाणराक्षसांना धुळीस मिळवून टाकण्यास—ज्या अधमाच्या अंगांत वीरश्री उत्पन्न होणार नाहीं, जो यांचा रक्तपात करण्याला अधीर होणार नाहीं, आणि जो आपल्या समशेरीला हात घालणार नाहीं, तो अस्सल हिंदुच नव्हे ! आज-पर्यंत कोणत्याही हिंदुराजाच्या अमलांत या राज्य-लक्ष्मीला परधर्मीयांचा विटाळ झाला नसून पवित्र चव्हाण कुलांत जन्म घेतलेला हा पृथ्विराज, तिला पठाणांनीं कवटाळलेलं पाहून आपले नेत्र अपवित्र करून घेण्या-पेक्षां या आर्यमातेच्या अब्रुरक्षणाकरितां—आणि पुर्व-जांच्या कीर्तीसुर्याचें तेज प्रखर करण्याकरतां—माझी सर्व

सेना गारद झाली, माझे द्रव्य भांडार रिकामें झालें, आणि माझ्या स्वतःच्या देहाच्या शत्रूंनीं चिंधड्या चिंधड्या उडविल्या तरी बेहत्तर आहे—पण तसें होईपावेतों हा पृथ्विराज हातांतील खड्ग न टाकतां पठाणांनां या देशांत कधींहीं पाय ठेऊं देणार नाहीं हीच माझी प्रतिज्ञा.

सं०—रामगुरू, बाबाला तुह्मी असंही सांगा कीं लेकरांचे अपराध पोटांत घालून उलट त्याच्यावर दया करणं हेंच खरं पितृप्रेमाचं लक्षण—तेव्हां संयोगितेनं केलेल्या अपराधाची तिला क्षमा करून ह्या वेळेला आपण रजपूतांचे सत्व कायम राखण्याकरितां आपल्या अफाट सेनेसह येऊन शत्रूला हाकून लावा हेंच आपल्या नांवाला, धर्माला आणि राठोड कुलाच्या लौकीकाला योग्य. तुमच्या कन्येनं आज तुमच्या मताविरुद्ध तुमच्याच धर्माच्या, तुमच्या कुलशीलास साजेलशा पतिला माळ घातली ह्मणून तुह्मी इतकें चवताळून गेलात खरे, पण आज तुह्मी आपल्या

देशाकरितां हातांत तरवार धरलां नाहींत तर उद्यां तुमच्याच वंशांतील रजपूत युवती परधर्मीय–दुष्ट–पठाण आपल्या झनान्यांत भरतील तेव्हां तुह्माला स्वर्गी किती दुःख होईल यांचा पूर्ण विचार करा आणि आपल्या फौजेसह लढाईला सिद्ध व्हा.

पृ०–लाडके शाबास! खऱ्या वीरपत्नीला आणि रजपूत कन्येला योग्य असाच निरोप पाठवितेस. रामगुरू अटपा, आता या घटकेला हें काम झालं पाहिजे.

शा०–महाराजांची आज्ञा. ( जातो. )

पृ०–( जासुदास ) अरे आज मी स्वतः सर्व सैन्याची टेहळणी करणार ह्मणून सैन्यांत वर्दी दे.

( जासूद मुजरा करून जातो. )

सं०–मालती या खेपेला मी सुद्धां लढाईवर जाणार बरं कां? तेव्हां माझाही घोडा आणि शस्त्र तयार असूं देत.

पृ०–रजपूतलोक आपल्याबरोबर स्त्रियांना लढाईला कधींच नेत नाहींत.

सं०—कां बर? कांहीं कांहीं प्रसंगीं स्त्रिया पुरुषांचेही प्राण वाचिवतात ह्मणून होय?

पृ०—लाडके त्याबद्दल मला धन्यता वाटते. पण त्या वेळेस शत्रु परधर्माचा आणि परदेशचा नसून आपल्या धर्माचा आणि तुझा पिताच होता पण आतां शत्रु महमदी धर्माचा असून हिंदुस्थानच्या बाहेरचा आहे तेव्हां कदाचित् दैवदुर्विलासानें रणांत आह्माला मरण आल्यास आमच्या स्त्रियांचें नख देखील शत्रूच्या नजरेस पडतां कामा नये; हे तूं कसें विसरलीस?

सं०—दिल्लीच्या राणीला तें पक्केपणीं माहित आहे; आणि पतिमरणानंतर कोणत्या उपायांनीं अब्रु बचावून पतिकडे जायचं हें फक्त तिलाच नव्हे, तर तिच्या सर्व स्त्रीप्रजेलाही माहित आहे.

पृ०—शाबास, ह्या तुझ्या एकेक गुणांनीं या पृथ्विराजाला किती तरी आनंद होत आहे! पण असे विचार तूं मनांत सुद्धां आणूं नकोस. देवाच्या दयेनें आणि

पूर्वजांच्या पुण्याईनं या पठाणांना पाताळांत दडपून टाकीन, आणि असा पराक्रम गाजवून सोडीन कीं रजपूत राजे जिवंत आहेत तोंपर्यंत पुन्हां शत्रूला या देशाकडे वांकड्या नजरेनें पाहण्याची देखील छाती होऊं नये !!

पडदा पडतो.

प्रवेश पहिला

समाप्त.

---

## प्रवेश दुसरा.

( कनोजच्या राजवाड्यांत जयचंद कोचावर पडला आहे. )

ज०—झाला. सर्वस्वी घात झाला. या कारटीच्या कृष्णकृत्यामुळें मला तर तोंड काढण्यासही जागा राहिली नाहीं. सबंध राठोड वंशाची अब्रु मलिन झाली; कनोजाधिपतिच्या प्रजेला लज्जेनें खालीं

माना घालाव्या लागल्या आणि खुद्द या जयचंदानें शत्रूला पकडण्यासाठीं पसरलेल्या जाळ्यांत स्वतः तोच सांपडला. काय भयंकर अपमान हा! ज्याच्या वंशाचा विध्वंस करण्याचा मीं विडा उचलला त्यालाच माझ्या पोटच्या पोरीनं माळ घालून त्यांचा वंश वाढविण्याला ती कारण व्हावी अं? यापेक्षां आणखी कोणता उपमर्द व्हायचा राहिला? शिव शिव! हे जग-न्नियंत्या माझ्या कोणत्या अपराधाबद्दल मला ही कडक शिक्षा दिलीस. यापेक्षां निबीड अरण्यांत क्रूर श्वाप-दांनीं माझ्या या देहाचे तुकडे तुकडे केले असते, तुफान दर्यांत गटंगळ्या खातांखातां मृत्यू आला असता, अगर प्रत्यक्ष मृत्यूनीं आपल्या अतिशय तीव्रशस्त्रांचा उप-योग करून मला जर्जर केलं असतं; तरी देखील ते सर्व मी मोठ्या खुषीनें सहन केलं असतं पण माझ्या शत्रूला जामात ह्मणून............छे–छे कल्पना कर-वत नाहीं. दुःखाचा कडेलोट झाला इथं. ( कांहीं वेळ सचिंत बसतों व एकदम पुढें येऊन ह्मणतो ) पण

कनोजाधिपती जयचंदाला असं रडतबसणं मुळींच शोभत नाहीं. या घोरकर्माबद्दल मी त्या दोघानाही या मृत्यू लोकांतून नाहींसे करीन तेव्हांच माझा राग शांत होईल. मी आपल्या सर्व सेनेसह दिल्लीवर चालून जाईन; त्या शहराचा विध्वंस करीन; तेथील सर्व प्रजेला पार गारद करून टाकीन आणि शेवटीं स्वतः पृथ्विराजाच्या या माझ्या खड्गाला बळी घेऊन मी त्यांचा पुरा सूड घेईन तेव्हांच हा माझा क्रोधाग्नी शांत होईल. मग त्या करिता माझे कांहीं झालें तरी बेहेत्तर. पण सूड; सूड उगविल्या वाचून विश्रांती ह्मणून घेणार नाहीं, हाच माझा निश्चय. सूडाखेरीज दुसरा विचार ह्मणून करायचाच नाहीं. ( जासूद येतो ) कायरे? काय आहे?

जा०—सरकार, दिल्लीहून कोणी रामगुरू नांवाचे सरदार आले आहेत आणि भेट घेऊं इच्छितात. यावर—

ज०—काय? कनोजच्या राजाला दिल्लीच्या रा-

जाचा निरोप? कांहीं तरी दुष्ट हेतूनेच असला पाहिजे. जा त्यांना आंत घेऊन ये आणि पाहरेकऱ्यानां हुशार रहा ह्मणून सांग; न जाणो कदाचित् वेळ आ-ल्यास—( जा० मुजरा करून जातो. ) कां बर ही स्वारी आली असावी? कदाचित् संयोगितेचा एखादा निरोप–पण छे तिला माझ्या रागाचा पुरा तडाखा माहीत आहे–तेव्हां तिची छातीच ( रामगुरू येतात.)

रा०–महाराज, आपला—

ज०–छे छे! आपण विजय चिंतणे आपल्या स्वामी-सेवेला बाधक होईल, बसा असे आणि काय हेतूनें आमच्या भेटिची इच्छा केलीत, तें कळू द्या.

रा०–जयचंद महाराज आपणाला राजा पृथ्वि-राजाचा असा निरोप आहे कीं, ‘ शहाबुद्दीन घोरी आपल्या देशावर चालून येत आहे तेव्हां त्याला पिटाळून लावण्यास तुह्मी आपल्या फौजेसह एकदम दिल्लीला यावेत. ’

ज०–काय शहाबुद्दीन घोरी हिंदुस्थानांत येऊ

पाहतो? वा: फार चांगलं करतो. कारण तशानं तरी दिल्लीचा नाश होईल.

रा०—महाराज एकवेळ या आर्यभूमींत पठाणांचा पांढरा पाय शिरला तर घराला कीड लागल्या प्रमाणें सबंध देशाचा नाश होईल आणि मग फक्त दिल्लीचाच विनाशकाल आला असं समजूं नका. तर शरीराच्या कोणत्याही भागाला इजा झाल्यास ज्याप्रमाणें सबंध देहाला त्याच्या वेदना होतात; त्या प्रमाणें हे पिशाश्च कालांतरानें सर्व देश काबीज करून चोहोंकडून तुमची हानि करील.

ज०—बस्स; हें ब्रह्मज्ञान तुह्मी आह्माला शिकवूं नका. पृथ्विराजानें केलेल्या अपराधांचें त्याला प्रायश्चित मिळण्याबद्दल सर्व देशाचा विध्वंस झाला तरी तो आह्माला कबूल आहे; आणि त्याबद्दल आह्मी काडी इतकीही फिकिर करित नाहीं.

रा०—महाराज, आपापसांतील कलह सर्व देशाचा नाश होण्यास, सर्व प्रजेचे हाल होण्यास, परधर्मी-

यांचे आपण दास होण्यास, आणि सर्व प्रकारें आपली हानि होण्यास कारण होणें इष्ट नाहीं.

ज०–कोणत्याही प्रकारें पृथ्विराजाचा सूड घेणें हेंच आह्माला इष्ट आहे, मग त्यांत कितीहि अनिष्ट गोष्टी घडल्या तरी हरकत नाहीं.

रा०–महाराज रजपूतांच्या कडवेपणाला—

ज०–हें पहा आपण आतां फार वेळ येथें घालविण्यांत कांहीं अर्थ नाहीं–माझा झालेला निश्चय कायमचा समजा. तो कधींही फिरणार नाहीं—

( रा० तसाच रागानें जातो. )

पृथ्विराजा आतां तुझें जयचंदा वांचून कसें चालतें तें पाहतो. तूं मला शरण आलास तरी देखील मी तुला क्षमा करणार नाहीं–घोरी तुझ्यावर चालून आल्यास त्याचेच हातून तुला मरण आलें तर आयतेच माझें कार्य होईल. आणि मग त्या घोरीला हा जयचंद हाकून देऊन सर्व भरतखंडावर एकटा राज्य करील; आणि घोरीचा पराभव झाल्यास मी स्वतः आपल्या फौजे-

सुद्धां त्याला मिळून तुझा सूड उगवीन हें तूं पक्कें ध्यानांत ठेव—असं केल्यानें मी देशद्रोही ठरेन हें खरें—पण या सूडा करितां हजार वेळ देशद्रोही व्हावे लागून मला नर्कवास सहन करावा लागला तरी तो मोठ्या आनंदानें सहन करीन पण एक वेळ सूड उगविण्याचा केलेला निश्चय या जय-चंदाचे कुडीत प्राण आहे तोंपर्यंत कधींही ढळणार नाहीं हें खास.

पडदा पडतो.

प्रवेश दुसरा समाप्त.

---

## प्रवेश तिसरा.

### दिल्लीचा राजवाडा.

( पृथ्वीराज—संयोगिता व समरसिंव्ह बसले आहेत. )

पृ०—मित्रा समरसिंव्हा तूं आपल्या मित्रत्वाला

लागून अशा आणिबाणीच्या प्रसंगीं मला सहाय्य करण्यास आलास हें पाहून मला फार आनंद होत आहे. खरोखर आर्यमातेचें नशीब अजून बलवत्तर आहे ह्मणूनच तिच्या संरक्षणार्थ तुमच्यासारखे वीर सर्वस्वाचा त्याग करण्यास तयार झाले.

सं०-हा समरसिंव्ह पृथ्विराजाची आज्ञा कधीं तरी मोडेल काय? पठाणानीं दिल्लीला वेढा दिला हें ऐकतांच बोलावण्याची वाट न पहाता मी आपल्या सर्व फौजे सुद्धां दिल्लीकडे येण्यास निघालो तोंच रस्त्यांत आपला निरोप पोंचला. दिल्ली पासून सुमारें मैलाचा अंतरावर येतांच समजलें कीं सामना दिल्या· खेरीज शहरांत प्रवेश करतां येत नाहीं-मग तिथेंच सर्व सेना ठेऊन एकटा वेष पालटून निघालो आणि सुखरूप येथें येऊन पोंचलो.

पृ०-वा-हें तर फार उत्तम झालं; कारण आपण आंतून हल्ला केल्यास सर्व मोंगल सैन्य आपणावर चालून येईल आणि त्यांच्या मागून तुझ्या सैन्यानें

हल्ला केल्यावर या गुलांमाची चांगलीच लांडगेतोड होईल. आणि दोन्ही कडून असा मारा होतांच यांचा फडशा उडवायला काय उशीर? समरसिंव्ह आज पासून मुख्य सेनापतिचें काम तूं पाहावेस अशी आमची इच्छा आहे. रामगुरू तुला मदत करण्यास आहेतच.

स०—पण या मानाला मी योग्य नाहीं.

सं०—भावोजी आह्माला जसं काई हें खरंच वाटेल नाहीं कां ?

स०—वहिनी खरं वाटणार नाहीं, तरी खरं वाटावं अशी माझी इच्छा आहे.

पृ०—हे पहा समरसिंव्हा आह्माला तसं जरी वाटलं तरी आमच्या करितां ह्मणून ह्याचा अव्हेर करूं नकोस ( तरवार देतो—समरसिंव्ह घेऊन )

स०—वहिनी आतां तरी मना सारखं झालं का?

सं०—भावोजी, खरंच झालं हो ?

पृ०—समरसिंव्ह राजा जयचंदाची आज पाहाटेपर्यंत

वाट पाहणार, आणि ठरल्याप्रमाणें आज पहाटेंच शत्रूच्या लोकांवर हल्ला करायचा. मग काय होईल तें होवो.

सं०—मला असंच वाटतं; कारण बाबा अशा वेळेला सुद्धा आपला मूळस्वभाव विसरतील असं वाटतं नाहीं.

पृ०—नशीब या भरतखंडाचं! ( सेवक येतो )

से०—सरकार रामगुरू आले आहेत.

पृ०—त्यानां लवकर आंत घेऊन ये. ( से. जातो.)

सं०—पण मित्रा तुला कसं वाटतं—जयचंद्र अशा निकराच्या वेळीं तुला सहाय्य करील किंवा कसें?

पृ०—अरे अशा प्रसंगीं आमचाच धर्मांचा जर दुसरा कोणी जयचंद्रा पेक्षांही दुष्मन असता तरी तो न बोलावता आला असता, पण या बद्दल मला कांहींच सांगवत नाहीं. ( रामगुरू येतो )

सं०—पण हे पहा आलेच ते. कां? कसं काय?

रा०—काय असायचं? भविष्य केल्या प्रमाणें जयचंदानें आपलें कर्तव्य झुगारून देऊन तो देशद्रोही होण्याला कबूल झाला.

पृ०—अहाहारे—राठोडकुळकलंका, [illegible] रजपूत जातीचा दुर्लौकीक करण्यास जिवंत तरी [illegible] राहिलास! हें आर्यजननी काय हें तुझे आर्यपुत्र! कोणत्या महाभागाच्या शापानें तुं असे मातृद्रोहीपुत्र प्रसवलीस!! अरे ज्या आर्यमातेच्या उदरीं तुह्मी जन्म घेतलांत, ज्या आर्यभूमीतील द्रव्यानें तुह्मी आज चैनीत दिवस घालविता, ज्या भरतखंडांतील प्रजेवर तुह्मी आज सत्ता चालवीत आहांत आणि ज्या जन्मभुमीच्या सेवेंत तुमच्या पुर्वजांनी अविश्रांतश्रम घेतले त्या तुह्मी आपल्या पुर्वजांचे नांव राखण्या करितां, त्या तुमच्या प्रजेच्या कल्याणा करितां, देशांतील द्रव्य संरक्षणा करितां आणि तुमच्या आर्यमातेच्या अब्रूरक्षणाकरितां हातांत खड्ग न धरता क्षत्रीय असून क्षणभंगूर जिवीताच्या मोहांत सांपडतां? धिःकार धिःकार असो तुमच्या शुरत्वाला आणि तुमच्या देशाभिमानाला! तुझ्या सारख्या देशद्रोही आणि मातृद्रोही पुत्राला जन्म दिल्याबद्दल ते पहा तुझे स्वर्गस्थ मातापिता दुःखानें चूर झाले

आहेत आणि तुझ्या या नीच कृतीनें रागाऊन खदीरांगारासारख्या नेत्रानें तुझं भस्म करूं पाहताहेतसं वाटते. शंढा व्यर्थ व्यर्थ तूं आपल्या मातेला कष्ट दिलेस; यापेक्षां एखाद्या पशूच्या जन्माला आला असतास तरी फार फार उत्तम झालं असतं—

सं०—मी अगोदरच भाकित केलं होतं. देवा कायरेही बाबानां दुर्बुद्धी दिलीस? बाबा आपापसांतील गृहकलहाला वश होऊन आपला देश परधर्मीय पठाण राक्षसांच्या स्वाधीन केल्याचं हे घोरपातक कोणत्या जन्मीं फेडाल? हाच कां तुह्माला तुमच्या पुर्वजांचा आणि मातृभूमीचा अभिमान? आमच्या सारख्या बायकांना सुद्धा अशा बिकट प्रसंगीं या दुष्ट पठाणांची खोड मोडण्याची इच्छा होत असून तुमच्या सारख्या क्षात्रकुलांत जन्म घेतलेल्या पुरुषांना भागुबाईचे ढंग आठवतात अं? काय हें दुर्दैव ! ! !

सं०—वहिनी, आतां त्याचा काय उपयोग? मित्रा अशा कुलांगाराचें पुन्हां नामोच्चरणही करूं नये. चला

आतां चालू प्रसंगाचें काय तें ठरवा.

पृ०—सिंव्हा तुझं ह्मणणं खरं आहे, पण या कल-हापासून होणारा परिणाम डोळ्यासमोर दिसूं लागला ह्मणजे काळीज फाटून जातें! पण काय करावं उपाय नाहीं.

स०—मग ठरल्याप्रमाणें सुर्योदयाचें सुमारास—

पृ०—अलबत्, गोमेचा एक पाय तुटला ह्मणजे कांहीं ती लंगडी होत नाहीं. एक जयचंद्र लढाईला आला नाहीं ह्मणून आह्मा रजपूत वीरसिंहांचें शौर्य त्यांनीं हिरावून नेलं नाहीं. हेंच तर काय, पण जयचंदासारखे इतर सर्व राजांनीं जरी माघार घेतली तरी या एकट्या पृथ्विराजानें देशसेवेकरितां रणयज्ञांत आपल्या प्राणाची आहुती देण्यास कधींही कमी केलें नसतें खास.

पडदा पडतो.

प्रवेश तिसरा समाप्त.

# प्रवेश चवथा.

## घोरीची छावणी

( घोरी व कांहीं सरदार एका तंबूत बसले आहेत. )

गोरी–देखो वज़ीर, देहलीको महासरा करनेको अर्सा दराज़ गुज़रा, ताहम ये का़फ़िर नाहिंजार कौ़म राजपूत बेदीन शहर देहलीको फ़तह नहीं होने देते. मुझे ऐसा मालूम होता है कि इसफ़िरकये बदबख्तको ज़ीनते इस्लामसे मुशर्रिफ़ होना रब्बुलआलमीनकोंही मंजूर नहीं है. ताअज्जूब ! बस ताअज्जुब ! ! कि ईंजानिब माबदौलत राहे दूरदराज़ तय करके वास्ते जिहाद करने कुफ्फ़ारोंके यहां पहुंचे. और अबतक माबदौलतकी शेर दिलफ़ौज हाथ पर हाथरक्खे हुए बैठीहै. नही मालूम होताकि कबतक महासरा देहलीका करना पड़ेगा.

वज़ीर—हुजूरवालाजाहको खुदावंदकरीम ताक़यामत क़ायम रक्खे. खुदाकी इनायतसे यह क़ाफ़िर लोग बहुत जल्द मुतीअ होकर इतायत बादशाहे जहान की कुबूल करेंगे, हुजूर पुरनूर कुछ फ़िक्र न फरमावैं. बहुत जल्द इन कुफ्फ़रान नाहिंजारको फ़ौज़ ज़फ़रमौज़ तहेतेग़ करके बाक़ीमांदः को ख़िलअते इस्लाम पहिनाकर मुशर्रिफ़करैगी. और इनपरही क्या मौक़ूफ़ है? तमाम जहानके कुफ्फ़ारोंको मज़हब इस्लामकी दावतदेंगे इस सूरतमें वलायते हिंदपर क्या मुनहसिरहै, थोडे अर्से में तमाम रूयेज़मीन पर दीनका झंडा लहराताहुआ हुजूर मुलाहिज़ा फरमावैंगे. हुजूर, खुदायेकरीम हमारे शामिल हाल है तो इन कुफ्फारोंको क़त्लकरनेमें क्या देर लगेगी. जबतक हुजूरी फ़ौजने शमशीर नहीं खींची तभीतक यहबरगश्तये बख्त, दुनियामें नज़र आतेहैं. मैं निहायत इन्किसारी और आजिज़ीसे दस्तबस्ता अर्ज़ करताहूं कि इस तरहसे महासराकरके फ़ौज़ ज़फ़र मौज़ को

बैठे रहना बिहतर नहीं है. चाहियेकि चारोंतरफ़से इन बदमाशोंको घेरकर तेहतेग़करें और शहर देहली-पर क़ब्ज़ये बादशाही जमावें.

जाफ़रखा सरदार—हुजूरवाला ! बग़ैर ख़याल फ़रमावैंकि अगर शहरदेहलीका कब्ज़ा करना ऐसा सहेल और आसानहोता तो हुजूरके इक़बालसे अब-तकक्यों दिरंग होती ? जांनिसारको मुनासिब मालूम होता हैकि थोड़े रोज तक और महासरा रक्खा जावे जिसके सबबसे पृथीराज मल्वून बबाइस न मिलने रसद और न पहुंचने मददके खुद मुतीअ होकर हाज़िर दरबारशाही होगा.

वज़ीर—ताअज्जुब है आपकी अक़्ल और होश-पर! पृथीराजके पास बहुत कुछ सामान रसदका मौजूद है. महासरे में रहेनेसे वह किसी तरह मुतीअ नहीं हो सकता. मुझे ताअज्जुब होता कि सरदारे जाफ़रखा इन कुफ्फ़ारोंपर हमला करनेसे क्यों डरते हैं. ऐसे कमहौसले सरदारोंके रहेनेसे अबतक देहली फ़तह नहुई.

गोरी—वज़ीर! तुमारी राय हमको बहुत पसंद है. बस, कल दुपहरको जिसवक्त कुफ्फ़ार खाने पीनेमें मशगूल होवें चारों तरफ़सें हमारी फ़ौज हमला करके पृथीराज नामाकूलको तहेतेग़करके देहली शहरपर अलमेशाही नसब करे. और तमाम मंदिरोंको नेस्त-नाबूद करके बुतोंके टुकड़े टुकड़े उडावे. और कुफ्फ़ा-रोंके घरोंमें घुसकर मालोअसबाब लूटें. और उनकी खूबसूरत औरतोंको पकडकर अपनी लौंडियां बनावें जिससे मज़हबे पाक़को रौनक़ होवै. और तमाम काफ़ि-रोंको ग़ारत करके तमाम हिंदुस्तानमें दीने इसलाम को ज़ीनत देवें.

वज़ीर—कौन यह बदमाश बरहना भागताहुआ इधर आ रहा है ? ( एक शिपाई उघडा धांवत येतो )

गोरी—यह बदज़ात शराबकेनशेमें मदहोश होकर भागता हुआ नज़र आता है. ऐसे लोगोंको करारवाक़ई सज़ा देना ज़रूर है. क्योंरे मलवून बेअक़ल तूनें किसके हुक्मसे शराब पिया ?

सिपाही-खु....दा....वं....द न्यामत ! ताबेदार खुदाको याद करके अर्ज़ करताहैकि मैनें-ऊंटके वास्ते चारा तोड़नेको दरख्तपर चढ़ाथा—

गोरी-बदमाश हमारे रूबरू दरोग़ कहैता है ?

सिपाही-तो....मे....रे....को.........

गोरी-क्या हुआ ? नामाकूल हमारे सामनेसे दफ़ हो.

सिपाही-न....हीं....हु....जू....र....अपनी छावनीपर एक अज़ीमुश्शान लष्कर.........

गोरी-ओ नामाकूल ! शराब पीकर और मदहोश होकर मुझको धोखा दिया चाहताहै ?

सिपाही-ना....हु....जू....र ( हरहर महादेव म्हणून समरसिंव्ह व रजपूत लोक एकदम येतात; पठाणांची फारचधांदल उडते )—

गोरी-तौबा ! तौबा ! ! क़ाफिर लोगोंका खौफनाक़ लष्कर इधरही आताहुआ नजर आरहाहै ! हमारी फ़ौजको हुक्म दो कि वो इन कुफ्फ़ारोंका

मुक़ाबला करके इनको शिकस्तदेकर भगावें. मारो ! काटो ! ! बोलो दीन ! ! दीन ! ! !

( आंत रणवाद्यें वाजतात बंदुकीचे आवाज होतात पडदा पडतो. लगेच पृथ्विराज नागवी तरवार घेऊन कांहीं रजपूत विरांसह येतो )

पृ०—पहाता काय? बोला हरहर महादेव; हे नोडग्यांचे लोक पळूं लागले कापा—उडवा गर्दन आणि ह्या अल्लाच्या घरीं पाठवून........( वजीर व कांहीं मुसलमान पळत येतात त्यापैकीं कांहींना रजपूत मारतात )

वज़ीर—( दचकून ) ऐं—ये देखिये ! पृथीराज ये खड़ा है. मेरे बहादुरो क्या देखते हो. इसी वक्त़ इस मलवूनका सर काटकर वासिले जहन्नुम करो ! [ चालून जातात ]

पृ०—हा पहा तुमच्या सारख्या आर्यशत्रूंचा कर्दमकाळ—वीरांनों पाहतां काय ? हीच वेळ आहे तुह्माला जिवाहून देखील प्यार अशा तुमच्या धर्माची व देशाची नासाडी करूं इच्छिणारे हे दुष्ट राक्षस—या

देशाची संपत्ती लुटूं पाहणारे चोर—आज सुदैवानें तुमच्या तडाक्यांत सांपडलें आहेत—तेव्हां शूर रजपूत बच्चानों! आपल्या ब्रिदाचें नांव राखण्यासाठीं—स्वदेशसेवे-साठीं तुह्मी आपल्या प्राणाला मुकलात तर मोक्षाला जाल—मर्दुमकी गाजवून जिवंत राहिलात तर यावच्चंद्रदिवाकरौ तुमच्या शूरत्वाचे लोक पोवाडे गातील. पण शत्रू समोर असतांना जर माघार घेतलीत तर मात्र तुह्मी आपल्या पुर्वजांच्या नांवाला कलंक लावाल—या देशांतच काय; पण सबंध जगांत तुमची नाचक्की होईल. तुमच्या बायका आणि पोरें तुमचा धिःकार करतील आणि मरणा नंतर तुह्माला रवरव नरकांत पडावे लागेल. चला बोला हरहर महा-देव ( दोन्ही पक्षाची झुंपते—वजीरास पृथ्विराज पिटाळतो. इतक्यांत समरसिंव्ह घोरीच्या मागे तरवार उपसून लागला आहे, घोरी मोडक्या तरवारीसह पुढें पळत आहे. त्याचे लोक रजपुतावर हल्ले करीत येतात; तोंच समरसिंव्ह त्याला खालीं पाडून

त्याच्या छातीवर बसतो व ह्मणतो. )

सं०—राक्षसा ! केलेल्या पापांचे स्मरण कर—हा पहा तुझा काळ तुझ्या छातिवर बसून तुला अल्लाचा डेरा दाखविण्यास सिद्ध झाला आहे. तुझ्या सारख्या दुष्ट कृतघ्नाला—( पृथ्विराजाचें लक्ष जाते )

पृ०—हंहं, सिंव्हा त्या मेंढराला मारून समशेर विटाळूं नकोस. त्याला जिवंत सोड. ( त्याला बांधतात पठाण खालीं माना घालतात. आंत विजयदुदुंभी वाजतात. रजपूत जयजयकार करितात. )

( समरसिंव्ह पृथ्विराजाला भेटतो )

पृ०—वाहवाहरे माझ्या सिंव्हा—नांवाप्रमाणें कृती करून त्या लांडग्याला बद्ध करून माझ्या समोर आण-लेस शाबास. शाबास. ( घोरीस )

क्यों बदबख्त ग़ोरी फिर कभी हिंदुस्तानकी तरफ़ मू करेगा ?

ग़ोरी—महाराजासाहब हुजूर, इसवक्त मै आपका

14

बन्दा गुलाम हूं; मेरी जान आपके कब्ज़ेकुदरतमे है मुझे जान बख़शिये. मैं तौबा करताहूं और यह क़सम खाताहूं कि अबसे फिर कभी हिंदकी तरफ़ मू न करूंगा मेरी जान बख्शिये. मै उम्मीद रखताहूं कि अज़राये-करम मुझे जानकी अमान देंगे क्योंकि आप लोग राजपूतहैं आप पनाह लेने वालोंको जान बख़शतेहैं; मैनें आपकीपनाह ली है; मेरीभी जान बख्शी जायगी ऐसी उम्मीद है !

पृथ्वी०—अच्छा माबदौलतनें इसवक्त तेरी जान बख़शी; जिससे जाहिर होगा कि क्षत्रीय राजा अपने दुशमन परभी कैसा एहसान करते हैं. सिर्फ़ लड़ाईका ख़र्चा दसलाख अशर्फ़ियां, बीस हज़ार घोडे पांच हजार हाथी इतना देकर अपने मुल्कको जल्द कूंच करे—

ग़ोरी—महाराजा साहब ! खुदावंत करीम आपको ताक़यामत सलामत रक्खे. आपका हुक्म ताबेदारको बसरोचश्म कुबूल है ! यह शाहबुद्दीन ग़ोरी आपके एहसानात तादमेज़ीस्त फरामोशनकरेगा.

( सलाम करून आपल्या लोकांसह जातो. )

पृ०—सर्व सेनेंत याला कोणीही अटकाव करूं नये ह्मणून वर्दी द्या—चला देवी आशा पुर्णेच्या कृपेनें आज जें हें आपल्या देशावरील संकट टळलें त्या बद्दल तिची मनोभावें प्रार्थना करा आणि चोहोंकडे आनंद करा.

( सर्व जण हात जोडतात. )

पडदा पडतो.

**अंक तिसरा समाप्त.**



# अंक चवथा.

## प्रवेश पाहिला.

स्थळः—कनोज येथील राजवाडा.

[ जयचंद खासगी खोलींत बसला आहे. ]

ज०—अरेरे काय हे आमच्या दुर्दैवाचें गोते? शत्रूचा नाश करण्याकरितां जी जी गोष्ट करावयास जातो; त्या त्या गोष्टींत हटकून मीच फसतो अं! प्रथमतः शत्रूचा अपमान करण्याच्या हेतूनें त्याला स्वयंवराला बोलावलें, त्यांत आह्मांला यश न येतां उलट आमचाच अपमान झाला. पुढें अपमान भरून काढण्यासाठीं कहरकंठीर सारख्या चतुर पुरुषाच्या सल्ल्यानें शत्रूचा पुतळा करून स्वयंवराचे दरबारीं चोपदाराचें जागीं बसाविला पण माझ्या कन्येनें शत्रूचा मान राखला आणि माझा मात्र उपमर्द केला. हें सहन न होऊन तिला मी बंदींत टाकली तरी ती कुलांगारी

माझ्या डोळ्यांत धूळ फेंकून त्या अधमाकडे, माझ्या कट्टया शत्रूकडे पळून गेली. काय हा परमेश्वराच्या घरचा न्याय ? शहाबुद्दीन घोरी सारखा कडव्या पठाणांनीं दिल्लीला वेढा दिला असतां उलट त्याचाच फडशा उडाला, हें ऐकून तर माझ्या काळजाला डागण्या दिल्या प्रमाणें वेदना होऊ लागल्या—शिव, शिव, घोरी-च्या हातून पृथ्विराजाला खास मुक्ति मिळणार अशी माझी खात्री झाली होती आणि त्यामुळें मी आनंदोद्यानांत सुखानें विहार करीत होते तोंच त्याचाच अपजय-वार्तेची भयंकर वावटळ सुटून माझ्या आनंदाचा ऱ्हास झाला. शत्रू जिवंत आहे तों पर्यंत या जयचंदाला सुखाची झोंप कधींही लागणार नाहीं. घोरीनं धैर्य धरून जर माझ्या निरोपाचा स्विकार केला तर अजून-सुद्धा मी आपल्या शत्रूचा सूड घेईन आणि सध्या तसेंच होणें इष्ट आहे. घोरी आणि मी मिळून पृथ्वि-राजाला नाहींसा केला कीं घोरीला हाकून लावण्यास काय उशीर ? सध्या फक्त घोरी आह्माला अनुकूल

झाला पाहिजे; दुसरें कांहीं नाहीं. पण अजून त्याचा कडून कांहींच कळत नाहीं हें कसें ? माझ्या बद्दल त्याला भलताच संशय आला नसेल ना? ( जासूद येतो )

जा०–( मुजरा करून ) सरकार बाहेर कोणी पठाण सरदार आला आहे ?

ज०–काय पठाण सरदार आला आहे ? त्याला लवकर आंत घेऊन ये ( जा. जातो. ) वाहवा काम फत्ते. आतां मात्र आमचें आनिष्ट ग्रह बदलले खास. हा सरदार स्वतः आला आहे, तेव्हां घोरीला आमचं ह्मणणं मान्य झालं खास. ( सरदार येतो )

ज०–सरदार जाफ़रखां ! आपके यहां तशरीफ़ लानेसे मुझे निहायत ख़ुशी हुई–बैठिये तशरीफ़ रखिये.

जा०–राजा साहब ! हमारे हुजूर वालाको आपकी राय बहुत पसंद आई लेकिन—

ज०–पसंद हुई; फिर लेकिन क्यों—

जा०–लेकिन इसवास्ते है कि, आपका दिल हमारी तरफ़ साफ़है. लेकिन खातरीके लिये हमारे

हुजूर पुरनूर की आपसे यह अर्ज़ है कि आपके दो बड़े बड़े सरदार जंग के इख्तताम तक कफ़ील रहना ज़रूर है.

ज०—हमे यह मंज़ूर है. यह राजपूत राजा जयचंद कभी बेइमानी न करैगा इसकी खातर जमा राखिये—

जा०—आपकी तो हमको वखूबी खातरीही है लेकिन जो मदद आप देना चाहतें हैं यह बात आपके बहादुर राजपूतोंको गवारा न होगी इस लिये यह अर्ज़ की-गईथी माफ़ कीजिये.

ज०—कुछ फिक्र नहीं; हमारे दो सरदार बाद-शाहकी ख़िदमतमें खुशीसे रहेना कुबूल करैगे.

जा०—आपका साफ़ दिल देखकर हमारे हुजूर-वाला बहुत खुश वखुर्रम होंगे.

ज०—आप लोगोंने जो हमारा कहना माना यह देखकर हमेभी निहायत खुशी हुई.

जा०—पृथीराजपर कब हमला कियाजाय इसका-

मी वक्त मुक़र्रर कीजिये.

ज॰—आजसे तीन रोज़ बाद मै अपनी कुल फौज तिझावड़ीके मशरक़की जानिब इकट्ठाकरके तैयार रहूंगा आपकी फ़ौज़ उसीजगह हमारी फ़ौज़से मिले—

जा॰—बहुत अच्छा ! बहुत मुनासिब ! हमारी फ़ौज़ उसी मुक़ामपर आपसे मिलेगी.

ज॰—फिर वहांपरही आप हम मिलकर हमला करनेकावक्त मुकर्रर करेंगे—इस हमलेमे हमको ज़रूर फ़तहयाबी हासिल होगी.

जा॰—बंदा रुख़सतका मुस्तजीहै; आदाब अर्ज़.

( मुजरे होतात तो जातो )

ज॰—पृथ्विराजा जयचंदाचा शत्रू होण्याचं प्रायः श्चित्त घेण्यास तयार हो; आणि कारटे संयोगितें माझ्या शत्रूला माळ घातल्याबद्दल वैधव्यांत जन्म घालविण्यास सिद्ध हो. हा जयचंद शत्रू पृथ्विच्या कोणत्याही भागांत जिवंत आहे तोंपर्यंत त्याला धुळीस मिळविल्या-खेरीज दुसरें कोणतेंही कृत्य करणार नाहीं. आज

पर्यंत बरेच बेत फसले पण अतां मात्र—

( एक जासूद येतो )

जा०—राजा जयचंद्राचा विजय असो—

ज०—इंच खास.

जा०—सरकार दिल्लीस गेलेला आपला हेर परत आला आहे.

ज०—वाहवा आजचा खरा सुदीन ! त्याला आंत घेऊन ये. ( जातो. ) बस्स आतां आमचं नशीब आ-म्हाला पूर्णपणें अनुकूल आहे. ह्याच सुमुहुर्तावर प्रस्थान ठेवण्यास कांहीं हरकत नाहीं. ( हेर येतो. )

ज०—काय खबर ?

हे०—सरकार सध्यांतर जिकडेतिकडे आनंदीआनंद चालू आहे.

ज०—पुढं होणाऱ्या दुःखाचं सूचक हें.

हे०—दिल्ली शहर आनंदपर्वताचं शिखर बनलं आहे.

ज०—तेंच आतां ज्वालामुखी पर्वताचं होईल.

हे०—पृथ्वीराज, समरसिंव्ह आणि संयोगिताबाई-

साहेब या तिघानीही सरकार त्यांना मिळाले नाहीत ह्मणून आपली फार नालस्ती केली.

ज०—वाईट काय झालं? त्यांच्या पापाच्या घड्यांत जास्त भर पडली.

हे०—यापेक्षां कांहीं कमीजास्त नजरेस पडलं नाहीं.

ज०—ठीक आहे जा; उद्या भेट. [ मुजरा करून जातो. ] माझी नालस्ती अं? काय करूं रे तूं येथून फार लांब पडलास नाहीतर; आतां तुझ्या नरडीचा घोट घेतला असतां. अरे, गर्विष्ठा आता तुझी घटका भरत आली, या मृत्युलोकीची तुझी सफर संपली; आणि तुझ्या दिल्लीला तुझ्यासारख्या उर्मट रा- राजाचा कंटाळा येऊन ती या जयचंद्राचा स्विकार करण्यास तयार झाली. पाहतो आतां तुझ्या सैन्याचें शूरत्व ! कोण आहेरे [ जासूद मुजरा करून उभा राहतो ] सर्व सैन्यांत माझी अशी आज्ञा सांग कीं उद्या बरोबर चार घटका रात्रीला कूच करण्या- ची तयारी पाहिजे. सर्व शस्त्रें वगैरे सामुग्री पुरवि-

ण्यास कारभाऱ्यांना ताकीद दे; जा.( जामूद जातो ) आमची दोन्हीं सैन्यें एक झाल्यावर मग दिल्ली घेण्याला काय उशीर ? या युद्धांत एकतर पृथ्वी-राजाला नाहींसा करीन; नाहींपेक्षां शत्रु संव्हारार्थ मी आपलें प्राण खर्ची घालीन.

पडदा पडतो.

प्रवेश पहिला

समाप्त.

## प्रवेश दुसरा.

[ दिल्लीच्या राजवाड्यांत पृथ्वीराज, संयोगिता, समरसिंव्ह बसले आहेत. ]

सं०—भावोजी आताच जाण्याची गोष्ट काढणं बरं नव्हे.

स०—हे पहा वहिनी, ज्या कार्याकरितां आलो होतो. तें तर ईश कृपेनें पार पडलं; आता—

पृ०–तरी पण आणखी कांहीं दिवस तूं येथें राहवेस अशी माझी फार इच्छा आहे.

स०–मित्रा आता आणखी किती दिवस बरं रहायच ?

पृ०–आणखी एक आठवडा तर खरा.

सं०–निदान पांच दिवस तरी मी जाऊ देणारच नाहीं; परवाचें दिवशीं देवी आशापुर्णेचा नवस फेडायचं ठरलं आहे. मग अशा वेळेला आम्ही कसं बरं आपल्याला जाऊ द्यावं ?

पृ०–खरच देवीच्या प्रसादाला तूं इथ राहिलाच पाहिजेस.

स०–आता वहिनीचं तरी मन कां मोडा ?

पृ०–आणि आमचं मोडलं तर फिकीर नाहीं. असच कीं नाहीं ?

सं०–जसं काई वहिनीच्याच शद्बावर जाणं रहित झालं असेल नाहीं ?

स०–बरंबुवा दोघांच्याही करितां राहिलो.

पृ०—बस्स आता आह्माला राग आला. दोघांच्या-हि करितां राहिलास तर पहिल्यांनदा एकालाच खूष ठेवण्याचा प्रयत्न कां केलास ?

सं०—भावोजी आता मात्र सांभाळा हो. माझी आपली समजूत तेव्हांच घालता आली; पण हा राग ह्मटलं बायकांच्या रागासारखा नाहीं.

स०—तरमग वहिनी; आमची बाजू सांभाळायाला तुह्मी आहातच.

पृ०—हं, रजपुतानीं स्त्रियाकडून आपली बाजू सांभाळून घेणं बरं नव्हे. स्वतः काय वाटेल तें—

सं०—पण स्त्रियांच्या पराक्रमानें आपला प्राण वाचवून घेणें मात्र बरं आहे हो.

स०—ह्मणजे ? हें काय आणखी नवीन ?

पृ०—हां; इथंच तर समयसूचकतेची कमाल आहे. फक्त एका वाक्यांत भावोजींची बाजू राखली आणि आमचा रागही घालविला. तुला वाटलं होतकां तुझी वहिनी इतकी—

सं०–वेडी असेल ह्मणून.

स०–शहाण्याला नेहमीं असच वाटत असतं.

सं०–आणि वेड्याला चढवायला शहाण्याला सुद्धा असचं बोलावं लागतं.

पृ०–अशा वाक्पंडीताला वेडं कोण ह्मणेल?

सं०–अधिकार असेल तोच ह्मणेल.

स०–आतां मात्र पृथ्विराजा खास हटेल.

सं०–नाहीं तर संयोगितेला तरी स्तब्ध बसावं लागेल !

पृ०–छे तिचं तोंड तर वाऱ्यासारखं चालेल.

सं०–पण त्याच्या उलट झालं तरच शोभेल.

पृ०–ह्मणजे पृथ्विराजाच्या कमजोर बाजुवर पांघरूण पडेल.

स०–पण मग मला मात्र वाईट वाटेल.

सं०–तर मग तसं होऊनये ह्मणून मीच माघार घेतें.

पृ०–नाहीं तर जसे कांहीं हरलेच नसते.

स०–आता पर्यंतच्या अनुभवावरून मला तर

तसेंच वाटते.

पृ०—असं बोलून आमचा मात्र अपमान केलासना ?

सं०—दुसऱ्या कडून तर झाला नाहींना ?

पृ०—वर बुवा आह्मी हरलो—आता तर झालं ? बर आता तें राहु द्या. खरंच मित्रा या दुष्टाना हांकून दिलेले पाहून जयचंद अजून स्वस्थ कसा बसला ?

सं०—अरे आता त्याचं काय चालणार ? त्याची आता खात्रीच झाली असेल—( जासूद येतो. )

जा०—महाराजांचा विजय असो.

पृ०—काय खबर आहे ?

जा०—तिळावडीच्या मैदानांजवळ पठाण सेना पुन्हां जमूं लागली.

स०—किती बेमान जातही—यांचावर उपकार करणं हेंच फार भयंकर पाप होईल.

जा०—त्यांचा रोख पुन्हां दिल्लीकडे येण्याचा दिसतो.

पृ०—अरे निव्वळ सर्पांची जातही—दूध पाजून त्यांचे प्राण वाचविले तरी उलटून दंश करायला कधींही

चुकणार नाहींत—सांपडतील तेथें ठेचलेच पाहिजेत. अरे बेमान घोरी हे पहा तुझे कर्दमकाळ तुझ्याशीं टक्कर देण्यास पुन्हां तयार आहेत. मित्रा आमच्या विरांना तयार होऊ दे—माझ्या लाडक्या रणधुरंदर वीरांच्या रणावेशाच्या जयघोषानें फक्त तिळावडीचें मैदानच काय ? पण सर्व भूमंडळ दणाणून सोडा—लढाऊ घोड्यांच्या कर्कश खिंकाळण्यानें—आणि रणवाद्यांच्या भयंकर नादानें आर्यमातेचें हितचिंतिणारे पण तपश्चर्येत गूंग झालेले महान महान् तपस्वी; यानां खडबडून जागे करा. हिंदु धर्माचे पालनकर्ते त्यांच्या लाडक्या धर्मावर कोणतें महत् संकट आलें आहे हें न जाणता सुस्त पडले असतील त्यांना धर्मरक्षणार्थ विरश्री उत्पन्न करा—असल क्षात्रकुलांत उत्पन्न झालेलें पण महत्त्वाकांक्षा—मत्सर, राज्यलोभ, परोत्कर्षसिहुष्णता—आणि आपसांतील द्वेष वगैरे दुष्ट डंकीणीच्या तडाक्यांत सांपडलेले कुलांगार जयचंदासारखे जे इतर मातृद्रोही असतील

त्यानां आपलें तोंड भीतीनें आणि लज्जेनें जमिनींत खुपसून घेऊं द्या. हिंदु स्त्रियांना सुद्धा; मृत्युभयानें रणाला न येणाऱ्या आपल्या पतिला धिःकारानें लाजवून त्यांच्या हातांत तरवार देण्याची इच्छा उत्पन्न करा. वृद्धापकाळामुळें निःशक्त झालेले, रोगानें पछाडलेले, बालवयांत असल्यामुळें लढाईला असमर्थ असलेले, आणि युद्धाचें नांव घेतल्याबरोबर अंगांत कांपरे भरणारे, निःसत्व, भेकड—यांना सुद्धा कंबर खेंचून रणमैदानांत देह ठेवण्याची इच्छा उत्पन्न करा. आमच्या देशाचे आणि हिंदुजातिचे यावच्चंद्रदिवाकरौ कल्याणच इच्छिणारे आमचे स्वर्गस्थ देवाधिदेव आणि पुर्वज यांच्या हृदयसागरांत प्रेमानंदाच्या लाटावर लाटा उचंबळू द्या ह्मणजे त्यांच्या शुभ आशिरवादाच्या योगानें असले अगणित शहाबुद्दीन धुळीला मिळवून टाकू. गोलंदाजानीं शत्रूच्या चिंधड्या उडवाव्यांत; धनुर्धारी वीरांनीं शत्रूच्या देहाला केसागणीत छिद्रें पाडावीत; तरवारबहाद्दरानीं शत्रूचीं शिरें असमानांत उडवावीत; भाले-

चाल्यानीं फक्त एकाच घावानें शत्रूच्या हाडांचा चुराडा चुराडा करावा. एवढेच नव्हे पण आमच्या घोडेस्वारांच्या घोड्यानीं मुद्धा आपल्या नालबंद टांचानीं शत्रूचा कपाळमोक्ष केला पाहिजे. सर्व तिलावडीचें मैदान–कौरव पांडवाच्या युद्धांत कौरव नाशानें कुरूक्षेत्र जसें रक्तमांसमय झाले होतें–तसें पठाणांच्या रक्तमांसानें अगदीं भरून गेले पाहिजे, गृध्रादी मांसाहारी पक्षांचें एक मोठें भोजनगृह झालें पाहिजे, आणि कुरूक्षेत्राचें नांव घेतल्याबरोबर ज्या प्रमाणें पांडवाचें शूरत्व डोळ्यासमोर येतें तसेंच तिलावडीच्या मैदानाची आठवण झाली कीं रजपूत शौर्याचे स्मरण होऊन पृथ्विचा अंत होईपर्यंत शत्रूच्या छातींत धडकी भरून स्वदेश बांधवांना अभिमान वाटला पाहिजे; हिंदुचा प्रताप रवी अक्षय प्रखर राहिला पाहिजे, आर्यपुत्रांची खऱ्या स्वदेशसेवेची कीर्ती दिगंत पसरत राहिली पाहिजे; अटपा, उद्या सकाळीं तिलावडीच्या मैदानांत रजपूतांची छावणी पडली पाहिजे.

स०—मला वाटत होतं कीं घोरीला सहा वेळ जीव-दान दिल्यामुळें तो पुन्हां आता रजपूत राजे जिवंत आहेत, तोंपर्यंत हिंदुस्थानांचें नांव घेणार नाहीं. पण यांनीं आपल्या नीच कृतीनें हे लोक यांच्यावर उपकार करण्यास किती लायक आहेत हें चांगलें दाखविलें. दिल्लीपतिशीं स्पर्धा करण्याला यांनीं प्रयत्न करणं ह्मणजे एखाद्या काजव्यानीं सुर्यनारायणाला दिपवू पाहणेंच होय—

सं०—हा पहा आणखी एक जासूद आला. ( जासूद येतो. )

पृ०—कायरे शत्रूसेना यावेळेस कोठें आहे? तिला-वडीच्या मैदानांत आली—का त्याच्याही पुढें ?

जा०—सरकार आत्ताच एका हेरानें बातमी आणली कीं घोरीचा तळ आहे तेथेंच आहे. पण—

पृ०—पण काय ?

जा०—पण मागच्यापेक्षां सैन्य फार मोठें आहे.

पृ० मूर्खा, पृथ्विराजाचा पदरीं राहून शत्रूसेना

मोठी असली तर भितोस ?

जा०—सरकार दिल्लीपतीच्या अन्नोदकाचा तसा गूणच नाहीं.

पृ०—मग—घाबरलास कां ?

जा०—सरकार घाबरलो नाहीं पण वाईट वाटतं—

पृ०—वाईट वाटतं ? तें तर त्याहून वाईट. रणमैदान हेंच रजपूतांचे विलास मंदीर—तेथें पडलास तर मोक्षाला जाशील.

जा०—तयार आहे सरकार—पण त्याबद्दल वाईट वाटत नाहीं.

पृ०—मग आणखी काय?

जा०—हेंच कीं शत्रू सैन्यांत कनोजचे राजे जयचंद आपल्या रजपूत सन्यासह आपल्याशीं लढण्यास तयार झाले आहे.

पृ०—अरेरे भयंकर वज्रपात ! कोण घोर वार्ता ही !! जयचंदा—हें पहा या आर्यभूमीचे पालनकर्ते राजा हरीश्चंद्र, रवीकुलमुगुटमणी रामचंद्र, हेंच काय पण

अत्यंत जुलमी राक्षस राजा रावण हे सुद्धा तुझ्या या नीच कृतीनें अगदीं संतप्त झाले. शत्रूनां हाकून लावण्याकरितां त्यांचावर शस्त्र न धरता स्वस्थ बसलास हे तरी कांहीं बरे केलेस; पण आता तूं स्वतः त्यानां मिळून आपल्याच आर्यमातेला कपटाने त्यांच्या हातीं देतोस, स्वराज्यलक्ष्मीला त्या पठाण राक्षसाच्या अंकावर बसवितोस, स्वधर्माचा आणि स्वजातीयबांधवांचा नाश करून त्यानां अनाथ करतोस ह्या सर्व पांपाची फळें जय-चंदा किती जन्में भोगावीं लागतील याचा विचार कर. लाखो वर्षें रवरव नर्कात कुजत पडलास तरी देखील तें कमीच होणार आहे. रवीपूत्र यमधर्मानें आपल्या सर्व कडक शिक्षा हजार वेळां तुझ्या सारख्या घातक्याला दिल्या तरी सुद्धा त्या पुरेशा होणार नाहींत. अरेरे धिःकार धिःकार असो या दिवट्या आर्यपुत्रांच्या आर्यत्वाला

[ एकदम कोंचावर बसतो ]

स०—मित्रा इतका त्रास करून घेऊ नकोस. मला वाटतं जयचंद कितीहीं मांगहृदयी झाला तरी, तो

उच्च अशा क्षात्रकुलांत जन्मला असल्यामुळें—त्याला अशा प्रसंगीं कोणी बोध केला तर त्याचा कांहीं तरी उपयोग होईल.

पृ०—निव्वळ भ्रम आहे हा ! अरे प्रत्यक्ष शत्रूला मिळून पक्का अनार्य बनलेला चांडाळ नुसत्या बोध वचनानीं कधींही सुमार्गाला लागणार नाहीं. तरी पण तुझी इच्छाच असल्यास पाठीव कुणाला तरी—

सं०—मला आज्ञा होईल तर मी जाऊन पाहीन.

स०—खरंच दुसरं कुणी जाण्यापेक्षां वहिनीच्या जाण्याचा जास्त उपयोग होईल.

पृ०—ठीक आहे—माझी ना नाहीं. पण वेष पालटून स्वसंरक्षणाची कांहीं तयारी करून मग जावं ह्मणजे—

सं०—ठीक आहे—तसच करत्ये.

पडदा पडतो.

प्रवेश दुसरा समाप्त.

---

# प्रवेश तिसरा.

तिलावडींचें मैदानांतील
पठाणांची छावणी

( जयचंद आपल्या तंबूत बसला आहे. )

ज०–हा घोरी मला वरून इतकं प्रेम दाखवितो पण मी याचा कावा पूर्ण ओळखून आहे. अरे तूं माझाशीं साखर पेरणी चालविलीस खरी, पण त्या पेरलेल्या विषवृक्षाच्या बिजाचा वृक्ष होऊन त्याला फळें येण्याची सुद्धा वेळ आली आहे; याची तुला वार्ता देखील नाहीं अं? एक वेळ मी आपल्या शत्रूचा सूड उगविला कीं संपली तुझ्या मदतिची गरज. मग तुला पुन्हां हिंदुस्थानाकडे पाहूं देणार नाहीं. तुमचा देश येथून फार लांब राहिला. आह्मी तुमचे या देशांत वाटेल तें केलें तरी तुमचं काय चालणार ? आतां माझ्या सारख्या रजपूत राजानीं तुझं साह्य मागूं नये हेंच योग्य खरें; पण शत्रूचा

सूड घेण्यापुढें मला योग्यायोग्य कांहीं सुचत नाहीं. आज माझे कित्येक मांडलीक राजे, घोरी या देशावर चालकरून आला हें त्यानां न साहून माझ्या मताविरूद्ध पृथ्विराजाला मिळाले आहेत त्यांचीहि खोड मोडायला आता किती अवधी ? पृथ्विराज सार्वभौम काय ? पाहतो आता कोण सार्वभौम होणार तें. ( जासूद येतो. ) कायरे ?

जा०—सरकार बाहेर एक रजपूत सरदार भेटीसाठीं उभा आहे.

ज०—त्याला आंत घेऊन ये. ( जासूद जातो. ) हा रजपूत सरदार कोण ? कदाचीत पृथ्विराजाकडे जाऊन पश्चात्ताप झालेला एखादा असावा. ( संयोगिता पुरुष वेशाने येते. )

सं०—पृथ्विराजाला जाऊन मिळाल्यामुळें पश्चात्ताप झालेला एकही रजपूत हयात नसेल ?

ज०—तर मग जयचंद्राकडे येण्याचं कांहीं काम नाहीं.

सं०-कामा वांचून येण्याऱ्या पैकीं मी नव्हे. ( जयचंद्राच्या पाया पडते. )

ज०-याचा अर्थ काय ? पृथ्विराजाच्या सरदारानीं जयचंदाला शरण येण्याची वेळ अजून थोडी लांब आहे.

सं०-बाबा आपण कांहीं ह्मटलंत तरी—

ज०-( तिला झिटकारून ) कोण? संयोगिता ? चल चालती हो. जा. जा. तुला पाहून माझ्या अंगाचा भडका होतो नुसता—

सं०-काय आपल्या पोटच्या पोरीला पाहून राजा जयचंद्राचे कपाळाला आठ्या ! इतका घोर प्रमाद माझ्या हातून घडला तरी काय ?

ज०—प्रमाद काय घडला ? आता फक्त आपल्या पित्याचा खून करण्याचंच राहलं आहे, बाकी सर्व आटपलं. कारटे, तुझ्यापासून मला किती समाधान वाटत असे, किती प्रेम येत असे, तुझे चोज पुरविण्याची किती हौस वाटत असे, तुझ्या रूपगुणसंपन्नतेवरून

मीच तर काय पण कनोज शहरांतील सर्व प्रजा तुला राठोडकुलनंदिनी या नांवानें हाका मारीत असत. असें असूनाहि तूं आपल्या पित्याची आज्ञा उल्लंघून त्याच्या शत्रूला—या नीच पृथ्विराजाला—माळ घातलीस ? यापेक्षां वीष खाऊन प्राण कां नाहीं दिलास ? तुझ्या या दुष्ट कृत्यानें तुला पाहून मला होत असलेला आनंद, तुझे लाड पुरविण्याची हौस आणि तुझा गौरव करण्याची इच्छा हीं सर्व लयास जाऊन एखाद्या मनुष्यभक्षक राक्षसी प्रमाणें तूं मला दिसूं लागलीस आणि एकदम तुझा शिरच्छेद करावा असें वाटतें; पण काय करूं इलाज चालत नाहीं. शिव! शिव!! राठोडकुलकिर्तिरवीला ग्रहण लावण्यास जिवंत तरी कशी राहिलीस ?

सं०—बाबा बोलतें याचा राग येऊं देऊं नका. वेळच आली त्याला उपाय नाहीं. राठोडकुलकिर्ति-रवीला माझ्या कृत्यानें जर ग्रहण लागलं असेल तर आपल्या कृत्यानं तो कायमचा काळा झाला असंच

ह्मणावं लागेल. हो! मी किती झालं तरी आपली कन्या; माझे अपराध पोटांत घालून मजवर दया करणं हेंच खरं पितृवात्सल्य आणि ह्मणून ह्मणते आपण मजवर दया करून दिल्लीपतीला साह्य करा ह्मणजे मी लावलेलं ग्रहण सोडविण्याचं श्रेय द्याल.

ज०—तुझ्या सारख्या राक्षसीवर दया करणें हेंच फार भयंकर पाप होय. रजपूतांच्या बाणेदारपणाकडे, राठोड पूर्वजांचं नांव राखण्याकडे, कनोज प्रजेच्या अश्रुकडे, आणि प्रत्यक्ष आपल्या बापाच्या भीतीकडे दुर्लक्ष करून तूं जें हें कृष्णकृत्य केलंस त्याबद्दल तुला जन्मभर वैधव्य भोगताना पाहीन तेव्हांच माझ्या नेत्रांचें पारणें फिटेल.

सं०—नकाहो नका! इतके कठोर होऊं नका. नित्य गोवध करणाऱ्या खाटकांना सुद्धां गाईच्या मानेवर सुरी चालवितांना तिला फारशा यातना होऊं नयेत असं वाटतं; मग तुमच्या सारख्या दयाळू पित्याला

आपल्या पोटच्या गोळ्याचा अशा क्रूरतेनं अंत व्हावा-असं वाटणं किती निंद्य ! कोण भयंकर !!

ज०—भयंकर ? ह्यांत कसला भयंकरपणा. अग तुझ्या त्या लाडक्याला हालहाल करून मारलेला, उभा जाळलेला, जिवंतपणीं पुरलेला, हेंच तर काय पण प्रलयकाळचा प्रभंजन सुटून त्याला पाताळांत दडपून टाकलेला, ज्वालामुखी पर्वतावर होरपळून पडलेला, हें सर्व वातावरण हलाहलमय होऊन त्यांत त्याचा अंत झालेला पाहणें हें देखील फारसें भयंकर होणार नाहीं.

सं०—बाबा पुरे करा. तुमची ती अमंगलवाणी ऐक-वत सुद्धां नाहीं. या कलियुगांत कली राजानें आपली सर्व विद्या आपणा एकट्यानांच शिकविली—

ज०—अशा अगणीत कलीच्या विद्या मला याव-याच्या होत्या, ह्मणजे या पेक्षांही भयंकर रीतीनें मी आपल्या शत्रूचा सूड उगविला असता—

सं०—बाबा निदान माझ्या करतां तरी या वेळेला

आपण दिल्लीपतिच्या सैन्यांत सामील व्हा.

ज०—तुझ्या करितां ? जिनें माझा मनोभंग करून मला जन्माचा दुर्दैवी बनविलें; तिच्यावर दया करून शत्रूचा सूड न उगविल्याबद्दल पुन्हां जन्मभर कुजत राहूं होय ?

सं०—एकूण राठोड कुलांत जन्म घेतलेला राजा जयचंद आपल्या हस्तानें आपल्या कन्येच्या सौभाग्य-मंदीराला अशी लावणार तर—

ज०—नुस्ती आग लावणार नाहीं पण त्यांत तीही जळून मेली तर मला संतोषच होणार आहे.

सं०—कांहीं हरकत नाहीं. सौभाग्य मंदीरालाच आग लागल्यावर ही वीरांगना न डगमगता त्यांत मोठ्या हौसेनें प्रवेश करून आपली हौस पुरवील, आह्मा क्षत्रीय स्त्रीयांचें सर्वस्व कार्यतें आमचे पति—त्यांच्या पश्चात एक क्षणभरही या मृत्यू लोकांत न राहणं हेंच आमचं कर्तव्य. मजकरतां नाहीं तर नाहीं; पण रजपूत जाती करतां तरी आपण या वेळेला

रजपुतानां मिळा. रजपुतांतील शूर अशा राठोड कुळांत जन्म घेतलात, तेव्हां त्यांना तरी मदत करा. ज्या रजपुतांची एकी, कडवेपणा, शूरत्व, समरधीरता, या सर्वोत्तम गुणा बद्दल आज अनेक वर्षें सर्व भरतखंड किर्ती गात आहे; ज्या रजपुतांनीं स्वास्त्रि-अब्रु रक्षणा बद्दल आणि आपल्या देशबंधुपालनार्थ आपल्या आप्तइष्टावर पाणी सोडून संपत्तीला लाथेनें झुगारून देऊन, ऐहीक सुखाकडे मुळींच लक्ष न देतां आपली समशेर गाजवून धारातिर्थी प्राण ठेविले; ज्या रजपूत शूर लढवय्यांनीं आज पर्यंत शत्रूपुढें कधींही खालीं मान केली नाहीं त्याच रजपूतांचा धीर, वीर जयचंदा सारख्या राजानीं शत्रुचा प्रतिकार करण्याकरितां नग्न खड्ग हातीं धरावयाचें सोडून उलट त्यांना साह्य करून आपल्याच लोकांचा संव्हार करण्यास तयार होणें किती निर्दयपणाचें, आणि अभिमानशून्यत्वाचें कृत्य हें! राठोडकुलकीर्तिरवीला ग्रहण लावण्यास कोण कारण झालं; हें आतां तरी आपल्याला

समजलं कां ?

ज०—बस्स. ह्या तुझ्या वटवटीचा कांहीं उपयोग होणार नाहीं. माझ्या शत्रूचा सूड उगवण्यापुढें मला माझ्या पोरीचा, जातीचा, प्रजेचा समूळ नाश झाला तरी पर्वा नाहीं. सर्व रजपूत प्रजेला रणांत मरावं लागलं, स्त्रियांना पठाणानीं माझ्या डोळ्यां देखत आपल्या महालांत खेचलं, पोराबाळांचे हालहाल करून प्राण घेतले; हेंच तर काय पण, या जगावर एकही रजपूत जिवंत राहिला नाहीं तरी देखील मी समाधान मानीन; पण पृथ्विराजाचा संव्हार आणि दिल्लीचा विध्वंस या गोष्टी घडल्या खेरीज मला कधींही सुखानें झोप येणार नाहीं.

सं०—बाबा कांहीं तरी विचार करा. मजकरितां नाहीं, रजपूतां करितां नाहीं, तरी निदान आपल्या देशा करितां आणि पुर्वजांच्या लौकिका करितां तरी या वेळेस घोरीला पिटाळून लावा. स्वदेशकामधेनूला स्वहस्तानें खाटकाचें स्वाधीन करण्याचे, स्वधर्मकल्प-

तरूवर स्वहस्तें कुऱ्हाड चालविण्याचें, आणि स्वकुल विमल कीर्तीध्वजाला स्वहस्तें काळाकुळकुळीत डाग लावण्याचें भयंकर पाप तुमच्या सारख्या शूर रजपूत राजानं करणं अगदीं अगदीं अयोग्य होईल. तुमचं मुख्य कर्तव्य त्या धेनुला चिखलांतून वर काढणें, त्या तरूला वेळोवेळीं पराक्रमानं उदक घालून विस्तृत करणें, आणि त्या ध्वजाला नेहमीं निर्मल फडकत ठेवणें हेंच होय. त्या आपल्या कर्तव्याला झुगारून, स्वाभिमान व देशाभिमान यांची पर्वा न करितां आपल्या शत्रूच्या स्वाधीन करण्यास, देवाच्या मुर्तींचा भंग करण्यास, पवित्रस्थानें भ्रष्ट करण्यास, आपल्या कुलाला, रजपूतांच्या ब्रिदाला, शुरत्वाला, धीरत्वाला कलंक लावण्यास प्रवृत्त होणें अगदीं अगदीं निंद्य ! प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्या पित्यानें अशी अनान्वित कर्में केलेलीं रजपूत कुळोत्पन्न कन्येला कशीं पाहवतील? स्वपित्याचा दुर्लौकीक, त्याचा सर्वांकडून झालेला धिःकार, छिः थू--या संयो-

गितेला कशी सहन व्हावी ? या पेक्षां आपल्या हातानें इचा शिरच्छेद करून नंतर आपल्या दुष्कीर्तीचा झेंडा या त्रिभूवनांत खुशाल नाचवा. ( तरवार पुढें टाकून व गुढगे टेकून मान पुढें करत्ये. )

ज०—बस्स. तूं आत्ता याक्षणीं येथून चालती हो. तुझ्या या बडबडण्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. नीघ—

सं०—( उठून ) काय ? आपल्याला आपल्या कन्येची, जातीची, आणि राज्याची कांहींच दया येत नाहीं ? इतकं कसं आपल हृदय कठोर झालं ? आपल्या या नीच कृत्यानं आर्यमातेचं सौभाग्य-भांडार हे पठाण लुटतील, सर्व प्रजा आपल्या नांवानें रडत बसेल, रजपूत स्त्रिया भ्रष्ट होण्याच्या भयानें जाळून घेतील. आर्यांचें आर्यत्व, शुरांचें शूरत्व, पवित्र तिर्थांचें पावित्र्य, आणि देशाचें वैभव नष्ट होईल, आणि प्रळयकाळच्या यातने पेक्षांहि दुस्सह यातना आपल्या या लाडक्या प्रजेला सोसाव्या

18

लागतील याचा कांहींतरी विचार करा, आणि स्वदेश-रक्षणाकरितां समशेर धरा.

ज०–तुला पुन्हां सांगतो कीं निघून जा; नाहीं-तर मला घालवून देणें भाग पडेल.

सं०–बाबा, विचार करा, विचार करा; इतकें मदांध होऊन मनुष्य जन्माचा दुरुपयोग करूं नका. तुमच्या कुळाचं स्मरण करा, पूर्वजांचा स्वार्थत्यागा-कडे लक्ष द्या, आणि शत्रूला गारद करून क्षत्रीय-व्रताचं चीज करा. अशी सुसंधी कधींहि येणार नाहीं हें ध्यानांत ठेवा. हे नीच पठाण या भरत-खंडातील संपत्ती लुटून नेऊन सुवर्णभूमि अगदीं कंगाल करितील; याचा जबरदस्त दोष आपणाकडे घेऊन पुढे पृथ्विचा अंत होई पर्यंत सर्व प्रजेकडून छिः, थू, आणि धिःकार करून घेऊं नका; हीच माझी पदर पसरून मागणी आहे.

ज०–ठीक आहे. पृथ्विराजाचा अंत होईपर्यंत इथंच अशी रडत, बैस. हा पहा मी आपल्या

उद्योगाला चाललो. ( रागानें निघून जातो. )

सं०—मी आपली शिकस्त केली पण ह्याना त्याचं कांहींच वाटलं नाहीं अं. परमेश्वरा यांचें क्षात्रकुलाचे तेज आणि सद्सद्विचार शक्ती हिराऊन नेण्यास तुला हींच कशी वेळ सांपडली. आर्य माते, काय हे तुझे पुत्र ! अशा पुत्रानां प्रसवण्या पेक्षां वंध्या राहिली असतोस तर काय वाईट होते ! प्रत्यक्ष तुझ्या पुत्रांनी तुझे अलंकार शत्रूस देण्याचें—तुझे सौभाग्यावर त्या कडून घाला घालविण्याचें आणि तुझ्या इतर लाडक्या लेकरांच्या तुझ्या समक्ष माना मुरगाळण्याचें साहस करावें. किती शरमेचें आणि मातृद्रोहाचें कृत्य हें ! अहाहा राजा जयचंद्रा तुं आपल्या बेचाळीस कुळांचा खरोखरच उद्धार केलास—शाबास ! शाबास !! बाबांचा हट्टीपणा स्वदेश बुडविण्याला कारण होईल असं मला स्वप्नांत सुद्धा वाटलं नाहीं. कोण दुर्धर प्रसंग हा ! कसं झालं तरी ते माझे जन्मदाते आहेत. असं नसतं तर फार बरं होतं; पण परमेश्वरा या संग्रा·

मांत शत्रूची सर्व सेना धुळीस मिळवून टाक. तुझें सर्व सामर्थ्य आह्मा रजपूत विरानां दे. त्या मेल्या घोरीची अशी धुळधाण कर कीं पुन्हां कोणत्याही वेळीं त्यानं हिंदुस्थानाचं नांव घेऊ नये. पण आमच्या बाबानां मात्र जिवंत ठेव; कारण ते पडलें कीं सुटले; मोक्षाला जातील. त्यांना जिवंत ठेऊन अशा कांहीं भयंकर शिक्षा भोगू दे कीं त्यामुळें त्यांना पूर्ण पश्चात्ताप होऊन ते झुरून मरतील. ह्मणजे देशद्रोही राक्षसानां तुझ्या कडून काय शासन मिळतें हें सर्वांनां पूर्णपणें समजून त्यांच्या कडून तरी असें हें भयंकर पाप होणार नाहीं.

पडदा पडतो.

## अंक चवथा समाप्त.

---



# अंक पाचवा.

## प्रवेश पहिला

स्थळ–दिल्लीच्या राजवाड्यांत
पृथ्वीराज व समरसिंव्ह
बसले आहेत.

पृ०–तूं कांहीं ह्मण पण; माझी खात्री आहे कीं जयचंदा सारखा हट्टी मनुष्य त्याचा हट्टीपणा इतक्या विकोपाला पोंचला असतां कधींही वळणार नाहीं.

स०–अरेरे देशसंरक्षकानीं देशसंव्हारक होणें; कोण नीचपणा !

पृ०–निचपणा? अरे फक्त नीचपणाच नव्हे पण अत्यंत लाजीरवाणे–भयंकर–आणि देशाभीमानाला का· लिमा आणणारें कृत्य हें.

स०–पण मित्रा आपल्या अंदाजा प्रमाणें जर जयचंद आपणाला मिळाला नाहीं. तर लागलीच कूच

करण्याचें ठरलें ना ?

पृ०—अलबत—आमच्या कुडींत प्राण आहे, तोंपर्यंत आह्मी कुणाच्याही मदतीशिवाय देशरक्षणाकरितां लढत राहणार हाच आमचा बाणा. पण ही पहा तुझी वहिनी आलीच—( संयोगिता दुःखानें चूर झालेली प्रवेष करिते. )

स०—कां वहिनी देशाची—

सं०—भावोजी—

पृ०—( रागानें चवताळून ) समजलं कायतें! अखेरीस फत्तर तो कायमचा फत्तरच त्याला कुठून दया येणार—चिंता नाहीं आह्मी कांहीं त्याचाच जोरावर आज पर्यंत लढलो नाहीं. ज्यांचा जोरावर या दिल्लीपतीला आज पर्यंत मोठमोठाल्या घनघोर रणसंग्रामांत विजयश्रीनें माळ घातली; ज्यांचा जोरावर राज्यलक्ष्मीचा अंगिकार करून तिला परस्वाधीन न करण्याची शपथ वाहिली; ज्यांचा जोरावर स्वदेश रक्षणार्थ या घोरीलाच कैक वेळां पीटाळून लावलें अशा माझ्या

शूर मर्द हिंदु बहादूरांची मला मदत असतां मी जय-चंदा सारख्या शंढाचे कधींही अर्जव केलें नव्हते पण काय करूं. माझा जन्म खऱ्या क्षात्रकुळांत झाला असून आणि या माझ्या मनाला लहानपणापासून फक्त स्वदेश-स्वराज्य आणि स्वजात यांच्या अभिमानांचेच बाळकडू मिळाल्यामुळें माझ्या जातीच्या एखाद्या राजानें या दुष्ट शत्रूस मिळून स्वदेश बांधवाची अब्रु मलीन करावी हें माझ्याच्यानें ऐकवत सुद्धां नाहीं ? माझ्या देशाचा-जातिचा आणि लाडक्या प्रजेचा विध्वस; प्रत्यक्ष माझ्याच जातिच्या एखाद्या कुलकलंक्यानें करण्यास तयार व्हावे अं ? जयचंदा अशी कशीं तुझी बुद्धी फिरली. असलें हें निंद्य कृत्य करतांना तुला तुझ्या कुळाची कांहींच लाज वाटली नाहीं काय ? तुझ्या पुर्वजांची मुळींच भिती वाटली नाहीं ? तुझ्या जन्मभुमीची किंचित सुद्धा दया आली नाहीं अं ? शिव, शिव-काय हें भयंकर पाप करतोस. उच्च अशा अशा हिंदु कुळांत जन्म घेऊन

शूर अशा रजपुतांचा राजा होऊन-आणि दुसरी सुवर्णभुमीच अशा भरतखंडांत राहत असून; अंत्यजाला सुद्धा त्याज्ज असें कृत्य करण्यास प्रवृत्त झालास याची तुला कांहीं तरी शरम ? अरेरे दुर्दैव; दुर्दैव या आर्यभूचें

स०-मित्रा आतां फक्त तोंडानं बोलण्यांत काय अर्थ आहे. आपलीं शस्त्रें हातांत धरून त्यांना त्याच्या नीच कृतीचीं फळें भागू द्या.

पृ०-ठीक आहे; आता तसंच-चला एकदम कूच करण्याचा डंका होऊं द्या. या दुष्ट चांडाळाची एक-दम कत्तल सुरू करा-लाडके चल आण माझी समशेर..................तूं आपल्या हस्तानें समशेर मजजवळ दिल्यावर कितीही बलाढ्य शत्रूचा काय पाड ? पार गारद करून टाकीन. मित्रा सर्व वीरांना जातानां देवी आशापुर्णेचें दर्शन घेऊन निघण्यास आज्ञा कर ह्मणजे तिच्याच कृपेनें, पठाणांचा आणि त्यांना मिळालेल्या विश्वास घातकी दुष्टांचा समूळ नाश

होऊन तुमच्या सर्व आशा पूर्ण होतील—( समरसिंह पडद्यांत जातो. ) चला; माझी समशेर—अरे पण हें काय ? ( संयोगितेला जवळ घेऊन ) पृथ्विराज रणाला जात असतां संयोगितेच्या डोळ्यांत अश्रू ? हें कांहीं बरं चिन्ह दिसत नाहीं. पण रजपूत वीर लढाईला जातांना शुभाशुभाची मुळींच पर्वा करीत नाहीं. पण लाडके तुझ्या सारख्या वीरांगनेला हें योग्य नव्हें.

सं०—( त्याच्या गळ्यांत हात टाकून व खांद्यावर डोकें टेकून ) या पूर्वीं मला अस्सं कध्धीं झालं नव्हतं. मग आजच काय झालं कोण जाणें—

पृ०—अगदीं खुळी आहेस. मी तुझ्या पित्याशीं सामना देण्यास जात आहे ह्मणून कदाचित् तुला अवघड वाटत असेल पण हा पृथ्विराज प्राण गेला तरी स्वजातीयांवर कधींही शस्त्र चालविणार नाहीं; याची तुला पक्की खात्री असूं दे.

सं०—छे छे. मला त्या बद्दल मुळींच कांहीं वाटत नाहीं. उलट या संग्रामांत माझ्या बाबांना देश द्रो-

हाच्या पातका बद्दल घोर शासन झालं तरच मला जास्त आनंद होणार आहे. कां हें कांहीं सांगता येत नाहीं; पण कससंच वाटतं हें खास–ह्मणून ह्मणते—

पृ०–काय इच्छा आहे सांग—

स०–कसंही करून या खेपेस मला बरोबर नेणं व्हावंच.

पृ०–काय अविचारीपणा हा ! अग देवीच्या कृपेनें आह्मी विजयी होऊन आल्यावर आपल्या कोमल हस्तानें रत्नजडीत ताटांत पंचारती घेऊन ओंवाळण्यास कोण बरं तयार राहील; किंवा आमच्या दुर्दैवानें कांहीं भलतेंच झाल्यास या दिल्लीच्या स्त्रियांची लाज कोणी राखावी ? याचा कांहीं तरी विचार कर—

सं०–आपल्या आज्ञे बाहेर मी कधींही जाणार नाहीं. मी इथं राहून विजयाची वार्ता समजतांच देवीच्या मंदिरापर्यंत सामोरी येईन; आणि देवीच्या कृपेनें असंच होणार. पण जर कदाचित् क्षत्रियाला

प्रिय असं रणांत मरण आल्यास सबंध दिल्लीला आग लावून त्यांत या देहाची आहुती देईन आणि या पायाचं ताबडतोब दर्शन घेईन.

पृ०-शाबास; आतां मात्र खऱ्या वीरपत्नीला योग्य असंच बोललीस ( रणशिंग वाजूं लागतें ) ही पहा सर्व तयारी झाली. आण ती समशेर; चल देवीच्या दर्शनाकरितां आज दोघेही बरोबर जाऊं. तिच्या कृपेनें सर्व मनाजोगें होईल समजलीस.

पडदा पडतो.

प्रवेश पाहिला समाप्त.

---

## प्रवेश दुसरा.

तिलावडीचें मैदान.

[ एका बाजूनें समरसिंव्ह-पृथ्विराजा व इतर सेनाधिपती जमतात. ]

समर-वीरानों ज्या या आर्यमातेच्या पोटीं-राजा

हरिश्चंद्र–पंडुपुत्र धनंजय–रामचंद्र–अश्वत्थामा–आणि भीष्म या सारखे वीर महावीर जन्मास आले व ज्यानीं आपल्या भुजबळानें दुष्टांचा नाश करून आपल्या मातेला धन्य केलें त्याच या आर्यभूमींत तुह्मी जन्म घेतला आहे; ह्मणून ह्मणतों कीं आपल्या पराक्रमानें आर्यमातेचा छळ करूं पाहणारे हे नीच पठाण राक्षस यांना जमीनदोस्त करून आपल्या विजयाचा झेंडा तिन्ही लोकांत फडकवा.

पृ०–शूर लढवय्यांनो–मला खात्री आहे कीं तुमच्या सारखे जवानमर्द रणदेवतेची कृपा संपादन केल्या वाचून कधींही परत फिरणार नाहींत–ज्या भरतखंडांत आज पर्यंत तुह्मी आणि तुमच्या पूर्वजांनीं राज्यसुखाचा पूर्ण अनुभव घेतला त्याच भरतखंडा-वर पठाण राजे राज्य करून आणि त्यांनीं तुह्माला गुलामांचे गुलाम केलेलं तुह्माला आवडेल काय ? ज्या राज्यलक्ष्मीच्या रक्षणार्थ तुमच्या पूर्वजांनी आपलें प्राण सुद्धा खर्ची घातले त्या राज्यलक्ष्मीला या पठा-

णांनी स्पर्श केला असतां तुह्मी स्वस्थ बसाल काय ? ( सर्वजण ' कधींही नाहीं ' ह्मणून ओरडतात ) तर मग सर्वांच्या हिता करितां घ्या देवाचें नांव, आणि उडवा शत्रूचा फडशा—रणामध्यें मृत्यु आला तरी माघार घेऊन छिः थू करून घेण्यापेक्षां आपल्या राज्याकरितां आणि स्त्रियांच्या अब्रूरक्षणाकरितां तरवार गाजवून धारातीर्थी देह ठेवा आणि स्वर्गांत आपल्या पूर्वजांना आनंदानें नाचवा; बोला हरहर महादेव ( सर्वजण जयकार करित जातात. दुसऱ्या बाजूनें घोरी जयचंद, वजीर व जाफरखां येतात. )

गोरी-यह देखो पृथीराज काफिरकी फौज सामने आ रहीहै; इसको जल्दी पायमाल और तबाह करके दीनका झंडा लहराओ. मात्र दौलतकी शेर दिल फौजके मुकाबिल यह कुत्ते क्या लड़सकेंगे ? ताज्जुब हैकि इस नामाकूल राजानें सात मर्तबे इस्लामे पाक को शिकस्त दी. इस दफ़े दिलखोलकर बहादरीके साथ इस मक्कार बदतीनत को पाब जंजीर करके हुजूरके रूबरू पेश

करो–( जयचंद्राकडे वळून ) राजा साहब ! आप अपना तमाम फ़ौज लेकर इसबदवख्तपर जल्दी हमला शुरू किजीये.

जय०–मैंभि तय्यार हूं. और इसीवक्त कूच करके इस नामाकूलसे अयनीबे इज्ज़तीका बदला लेकर अपने कौलको पुरा करताहूं. [ जातो ]

ग़ोरी–( वजीरास ) यह काफ़िरेनाहिंजार शायद अपनेसे बेमानी करे इसवास्ते जाफ़रखां सरदारको उसके हमराह रहना चाहिये. जिसवक्त उसकी तरफ़से किसी तरहकी बेमानीका शुबह गुज़रे; फ़ौरन उसको तहेतेग़ करना जुरूर होगा. तबतक उसनें समरसिंहसे मुक़ाबला करते रहना.

जाफ़र०–हुज़ूर ! ताबेदार तय्यार है. फिल फ़ौर समरसिंह बदबख़्तका सर काटकर हुज़ूरके कदमोंपर डालताहूं ( जातो )

( आंत रणवाद्यें वाजतात दोन्हीं पक्षाच्या लोकाचें 'हरहर महादेव' आणि 'दीन दीन' अशी ओरड होते. )

गोरी०—( वजीरास ) वजीर ये देखो ! कैसा महारबत अजीम हो रहा है ! ! और हमारे राजा जयचंद किस बहादरी और जवांमर्दीके साथ दुष्मनका मुकाबिलाकर रहेहैं व सबब कसरत फौजके चारों तरफ गर्दी गुबारहो रहा है. बहादुरोंके ललकारसे, घोड़ोंके हिनहिनाट, और तोपोंकी गरजसे तमाम जमीन और आस्मान गुंज रहा है. खूनका दर्या बहनेसे मैदाने जंग सुर्ख हो रहा है और लाशोंके पुश्ते पर पुश्ते पड़नेसे एक पहाड़की मानिंद नजर आता है. हमारी फौजजफरमौज काफीरे बेदीनोके किस बहादरी और दिलेरिसे जहन्नुम वासिलकर रहीहै---लेकीन जाफरखा पर कोन शक्स हमला करके आ रहा है. इस वक्त हम ज़ातसे जाकर उसको मदद करे—और दुसरी तरफसे तुम जाकर उसपर हमला करो.

( जातो. तोंच पृथ्विराज कांहीं लोकांसह येतो. )

वजीर.................आः ये शैतान कंहासे आकर मौजूद हुवा ! एक मर्तबःतो खुदा खुदा करके इस

मलेकुलमौतके पंजेसे मेरी जान बची–लेकीन अब खुदाही हाफिज है [ धैर्यानें ] आईये राजा साब–मै आपके ही इन्तजारमे खडा हूं.

पृ०–और हमभी आपके वास्ते तय्यार है.(आपल्या लोकांकडे वळून ) वीरांनों पाहतां काय? उडवा या नोवग्यांची गर्दन. मारा–बोला हरहरमहादेव. ( लढत लढत आंत जातात. )

( रक्तानें भरलेला पृथ्विराज दोन शिपायांवर भार टाकून येतो. )

१ला०–महाराजांनीं थोडा वेळ विश्रांति घ्यावी. शरीराला जखमा फार मोठ्या झाल्या आहेत.

पृ०–पण मला इकडे काय म्हणून आणलं? आम्हां रजपुतांना जखमा रत्नालंकाराप्रमाणें शोभाच देतात. या जखमांच्या मोबदला वजीराचा प्राण मिळाला. आणखी काय पाहिजे?

२रा०–सरकारला जखम लागून घोड्यावरून पडतांच आम्ही इथं आणलं; पण सैन्यांत बराच घोटाळा

उडण्याचा संभव आहे.

पृ०—अरेरे ! मग मला इथं आणलत हें फार वाईट केलत. मला आतां घोड्यावर बसवा. घोडा—( मांडीला हात लावून ) अरेरे........

१ ला०—अबब! महाराज केवढी ही जबर जखम ! दम धरा. मी आतां तिला बांधून टाकतो. अरे तूं जा, आणि महाराजांचे कुशल सैन्यांत कळीव; जा. ( जखम बांधू लागतो तोंच उजव्या दंडांतून रक्त वाहत होतें त्याकडे त्याचें लक्ष जाऊन ) अरे बापरे! सरकार ही दुसरी जखम केवढी भयंकर ! कोणत्या दुष्टाचा बाण हा ! !

पृ०—अं, त्यांत काय आहे ? आतां बरी होईल. पण माझा घोडा आण अगोदर.

१ ला०—सरकार इतक्यातच—

पृ०—तें कांहीं नाहीं. या पठाणांचा नाश करून आर्यमातेचें ओझें हलके केल्या खेरीज विश्रांती ह्मणून कधींही घेणार नाही. हा पहा मी [ उठू लागतो

20

तोंच पडतो. ] अरेरे पाय गेला—[ हुजऱ्या येतो ]

हु०-सरकार रामगुरु पडले.

पृ०-त्याबद्दल वजीरालाही पाडला. [ दुसरा हुजऱ्या येतो ]

हु०-सरकार जाफरखाला समरसिंव्ह महाराजांनीं ठार मारला.

पृ०-शाबास. त्यानं आपल्या नांवाप्रमाणेंच केलं.

हु०-पण जयचंद आमच्या महाराजाच्या सैन्याचा सारखा फडशा उडवीत आहेत तरी समरसिंव्हमहाराज फक्त पठाणावरच शस्त्र चालवीत आहेत.

पृ०-( आनंदानें ) तोच एक खरा रजपूतसिंह. हरकत नाहीं. त्याच्या जन्माचं सार्थक झालं ( रागावून ) पण हा पहा कुऱ्हाडीचा दांडा गवतास काळ झाला. अरेरे....जयचंदा कुजून कुजून मरशील. रवरव नर्कांत पडावं लागेल........आता काय ? आटपा माझा घोडा बस्स. तरवार; तरवार आण....दुर्दैव.... लढाइचं पारडं फिरलं....उठा एकदम.

( तिसरा हु. येतो. )

हु०—सरकार जरीपटक्याचा कळस पडला—

पृ०—त्याजागीं घोरीचें शीर लटकवा.

हु०—आणि हें पहा शत्रूसैन्य इकडेंच लोटलें.

पृ०—फार उत्तम. आपण होऊन मृत्युमुखीं येतात. चला सर्व सैन्य एकदम जमवा.

( राजा जयचंद आपल्या लोकांसह येतो. )

ज०—कुठें आहे तो उर्मट पृथ्विराज?

पृ०—( एकदम तरवार घेऊन उठतो ) हा पहा इथं. ( तरवार फेंकून तोंड फिरवून ) पण जा, जा. तूं कितीही झालास तरी रजपूत बिजाचा आहेस. स्वजातीयांवर हा पृथ्विराजा कधींहि शस्त्र धरणार नाहीं. नीघ; तुझें तें कृष्णवदन सुद्धां मला दाखवूं नकोस.

ज०—अहारे भेकडा, स्वजातीयांवर शस्त्र धरीत नाहीं असें ह्मणण्यापेक्षां धरण्याची हिंमत नाहीं असें ह्मणण्याची शरम वाटते होय?

पृ०—नीचा, शरम कुणाला वाटली पाहिजे? स्वदेशाकरितां प्राण देण्यास तयार झालेल्या पृथ्विराजाला, कां स्वदेश शत्रू स्वाधीन करणाऱ्या जयचंदाला? स्वधर्मोन्नत्ती करतां हातीं समशेर धरणाऱ्या दिल्लीपतीला, कां त्याचा विध्वंस करण्यास प्रवृत्त झालेल्या जयचंदाला. स्वदेशियांच्या प्राणरक्षणाकरितां कंबर खेचलेल्या पृथ्विराजाला, कां त्यांची कत्तल करूं पाहणाऱ्या जयचंदाला? हिंदु स्त्रियांची अब्रु वचाविण्या करितां स्वतःचा प्राण बळी देण्यास तयार झालेल्या पृथ्विराजाला, कां त्यांच्या पातिव्रत्त्यावर झडप घालण्यास पठाणांना उत्तेजन देणाऱ्या जयचंदाला? पठाणाना हांकून देण्याकरितां आपले सर्वस्व गमावण्यास तयार झालेल्या पृथ्विराजाला, कां त्यानां स्वदेशाचा विध्वंस करण्याचें कामीं मदत करणाऱ्या, नीच, कुलकुलंक्या जयचंदाला; अं? कांहींतरी विचार कर. फक्त तुझ्या एकट्याच्या या विश्वासघातकीपणामुळें सर्वंध भरतखण्ड स्वरा-

ज्याला मुकलें, हिंदुधर्माचा नायनाट झाला, रजपुतांच्या शूरत्वाला काळोखी लागली आणि तूं आज हा असा विश्वासघातकी निघालास ह्मणून सबंध रजपूत जातीला खालीं मान घालण्याची पाळी आली ! तुझ्या देश-द्रोहीपणाबद्दल यावच्चंद्रदिवाकरौ सर्व आबालवृद्ध तुझं नांव कानीं पडताच तुझा तिटकारा करतील, छिः थू करतील, याची तुला पक्की खातरी असूं दे. कारण त्यांचा सर्वस्वी नाश होण्याला कारण तूं झालास.

ज०—अरे तुझ्या सारख्या पोराकडून मी कधींही अपमान करून घेणार नाहीं. माझ्या मर्दानों पहाता काय ? द्या या मर्कटाला उडवून आणि घ्या आपला सूड उगवून.

[ दोन्ही पक्षाचे लोक शस्त्रें उचलतात. ]

पृ०—हं खबरदार माझ्या पैकीं कोणी शस्त्र काढल्यास. माझे रणधुरंधरानों आपल्याच लोकांना मारून नर्कांचें साधन करून घेऊं नका. जयचंदा तुझ्या सारख्या भेंकड, शत्रूला मिळणाऱ्या, विश्वास घातक्या-

ला मारून मी आपलें शस्त्र कधींही विटाळणार नाहीं; तुला प्राणदान देतो. जा. त्या घोरीच्या पायावर लोटांगण घालून त्याची मर्जी संपादन कर. अरे एवढें हें अफाट सैन्य–तुझेच देशबांधव–आपल्या आप्तइष्टांचा मोह तोडून, घरादारावर पाणी सोडून, आपल्या जिवाची देखील पर्वा न करितां मोठ्या आनंदानें देशसेवेस निघाले आहेत; हें पाहूनहि तुला शरम वाटत नाहीं; आपल्या देशाची, धर्माची दया येत नाहीं; शत्रूचा तिटकारा येऊन त्यांना जमीनदोस्त करण्याची बुद्धी होत नाहीं; किती नामर्दपणाची आणि स्वदेश–धर्माभिमानशून्यत्वाची गोष्टही! धिःकार धिःकार असो तुझ्या या पुरुषार्थाला. या पेक्षां एखाद्या पशूच्या अथवा स्त्रीच्या जन्माला कां आला नाहींस ? ( एक स्वार धांवत येतो. ) काय खबर?

स्वार–सरकार खबर फार दुःखाची आहे.

पृ०–जयचंद देशद्रोही ठरला यापेक्षांहि दुःखाची ?

काय ती सांग लवकर.

स्वा०—सरकार वजीराला मारतांना जखमा लागून पडले तेंव्हांच सर्व सैन्यांत आपल्या अंताची बातमी पसरली त्यापैकींच एकानें ती तावडतोब दिल्लीस पोंचविली. ती बातमी पसरतांच सर्व दिल्लीच्या स्त्रियांना राजवाड्यांत बोलावून राणी साहेबांनी वाड्यास आग लावून दिली आणि त्यांतच सर्वांचा अंत झाला.

पृ०—पापिष्टा जयचंदा तुझ्या विषवृक्षाचें पहिलें फळ हें. केवढी दुःखाची गोष्ट ! यापुढें पृथ्विराजाचा अंत, देशाचा नाश, धर्मांची हानी, स्वराज्याचा शेंवट वगैरे फळें त्याला लटकलीच ह्मणून समज. या सर्वांला कारण तूं—चांडाळ—राक्षस—निर्दयी........ अहाहा लाडके तूं मात्र खरी वीरांगना आणि पतिव्रता. वैधव्याचा डाग सुद्धां लागूं न देतां पति येण्यापूर्वींच त्याला पंचारती घेऊन ओंवाळण्यास पुढें गेलीस अं ? धन्य धन्य तुझ्या प्रेमाची !! मीहि तुला फार वेळ विरह सहन करण्यास लावणार नाहीं. पण राक्षसा

तुझी मात्र काय दशा होईल! देशद्रोह, धर्मद्रोह, राजलक्ष्मीचा त्याग आणि कन्येचा नाश एवढीं भयंकर पापें किती जन्म भोगशील !!! अरेरे ! हें पंचमहाभूतानों तुह्मी या वेळेला स्तब्ध कसें बसलात. या कृतघ्न जयचंदाला अजून जिवंत ठेवण्या इतकी शांतता कशी धरलीत ! ! परमेश्वरा तूं सर्व ज्ञानी असून हा पापी जयचंद तुला अजून दिसला नाही काय ?

पृथ्विराजाचे लोक–सरकार ते पहा पठाण आले.

पृ०–मग पहाता काय–क्षत्रीयांच्या पोटीं जन्म घेतल्याच चिज करा. [ घोरीचे कांहीं लोक व दुसरी कडून समरसिंव्ह लोकांसह येतो. हल्ला करतात त्यांत पृथ्विराजाचें लोक हटतात व पृथ्विराजा पडतो. समरसिंव्ह आपल्या मांडीवर घेतो. ]

पृ०–झालं–अटपलं देशा........ची स्वतंत्रता गेली. हिंदु प्रजेचं दु........दैंव ओढवलं आणि पृथ्विराजाची घ........ट........का........भरली ( समरसिंव्हाला जवळ घेऊन ) सिंव्हा हे असिधाराव्रत सोडूं नकोस. हें

प........हा—जयचंदा तुला कृतकर्माची फळें मो........गावीं लागतील. ( मरतो. )

स०—( डोळ्यास पदर लावून ) माते वसूधंरे तुझ्या रत्नहारातील मुख्य रत्न हारपलें—यापुढें क्षत्रीयांचा मोहरा खास लयास गेला. रजपूतांचे शूरत्व नाहिसें झालें आणि सर्व प्रकारें हिंदुस्थानचें दुर्दैवओढवलं—चला आतां शवाची पुढची व्यवस्था करणें जरूर आहे.[ घोरी धावत येतो. ]

घो०—[ धांवत येऊन ] अफसोस—सद अफसोस. किस बदजातनें ऐसे बहादुर जवामर्द राजाको कत्ल किया. हमारा ये सक्त हुक्म था के राजाको जिंदा गिरफ़तार करके हजर करे. ऐसा खुपसूरत और जवामर्द मैंने आज तक नहीं देखा—अल्ला अल्ला कैसे कैंसे जखमकारी बदनपर लगे है. यह देखकर मुझे निहायत रंज होताहै. पृथीराजा—अगरने जयचंद तुमारा शरीक न हुवा तोभी तुम तन्हा होकर अपने मुल्क और मजहबकी बेहबुदी और बहतरीके वास्ते

अपनी जान निसार की. क्या तेरी जवामर्दी ! आ-फरीं–सद आफरीं. तूने निहायत फैय्याजीसे १ मर्तबा मेरी जान बख्शीकी; लेकीन मैं ऐसा बदनसीब हूं की मुझे एक वक्तभी तेरी जान बख्शी करनेका मोका न मिला. अब तुमारी लाशको तुमारे लोगोंकूं सुपुर्द करताहु. और ऐसे जवामर्द बहादुरके वास्ते मै बहोत खुषीसें ताजीम देताहूं. [ राजमुकुट व तरवार खाली ठेऊन मुजरा करितो–समरसिंव्ह व त्याचें लोक प्रेत उचलूं लागतात. ]

पडदा पडतो.

---



# शुद्धिपत्र.

पुस्तक बऱ्याच घाईनें प्रसिद्ध करणें भाग पडल्यामुळें पुस्तकांत बऱ्याच ठिकाणीं चुका राहिल्या आहेत त्यांतील कांहीं ठळक खालीं शुद्ध केल्या आहेत.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३ | १७ | कटया | कट्ट्या |
| १७ | २ | पण्डं | खण्डं |
| १८ | २ | पृथ्वूराज | पृथूराज |
| २६ | १० | आष्ठसुलतान | अष्टसुलतान |
| २९ | १० | सूर्य नारायण | सूर्यनारायण |
| ३७ | ७ | हातील | होतील |
| ४१ | ९ | पंचानन | वृद्ध |
| ४३ | ८ | व | ( शद्ब नको ) |
| ४३ | १७ | पजर्न्य | पर्जन्य |
| ५० | ९ | ओलांडून | ओलांडू |
| ५५ | १३ | महराज | महाराज |
| ५७ | १४ | सौदर्यदेवी | सौंदर्यदेवी |
| ६१ | ६ | मानसींग | रामसिंव्ह |
| ७१ | ७ | भाग | मार्ग |

| | | | |
|---|---|---|---|
| ९२ | ६ | सं०— | स॰— |
| १०५ | २ | ” | ” |
| १०५ | ८ | दृदुंभी | दुंदुभी |
| १०५ | ११ | वाहवाहरे | वाहवारे |
| १०७ | ३ | आशा पूर्णेच्या | आशापूर्णेच्या |
| १०९ | ३ | सारखा | सारख्या |
| ” | ९ | होते | होतो |
| ११० | ८ | आनिष्ट | अनिष्ट |
| ११४ | ११ | रा— | ( शब्द नको ) |
| १२० | १५ | परोत्कर्षसिहुष्णता | परोत्कर्षासहिष्णुता. |
| १२४ | १३ | सन्यासह | सैन्यासह |
| १४३ | १० | विध्वस | विध्वंस |
| १४३ | १५ | तुझा | तुझ्या |
| ” | १७ | अशा | ( शब्द नको ) |
| १४४ | ८ | भागू | भोगू |
| १५६ | १५ | कुलकुलक्या | कुलकरंक्या |
| १९९ | ११ | वगैरे | हीं सर्व |
| १६१ | १४ | यह | इन्को |
| १६१ | ३ | वसुधंरे | वसुंधरे |

